*



# अंजननिदानाची सूचि.

# प्रस्तावना.

ह्या सृष्टीचा रमणीय आणि कल्पनेलाही थक्क करून सोडणारा देखावा पाहून त्याचें आदिकारण शोधण्याविषयीं जसें सुज्ञाचें मन विचार करूं लागतें, त्याचप्रमाणें ह्या सुखकारक अशा संसारांत मनुष्याच्या शरीराला दुःखकारक अशा व्याधींनीं पीडिलेलें पाहून त्याचें आदिकारण शोधण्याकडे आमच्या परमकारुणिक ऋषिमंडळांचें लक्ष वेधलें, आणि त्यांनीं आपल्या त्रिकालाबाधित अशा दिव्य ज्ञानशक्तीनें त्याचें कारण शोधून त्याच्या प्रतिकाराविषयींचे उपाय व नियम ह्यांविषयीं एक शास्त्र तयार केलें. त्यालाच आयुर्वेद असें म्हटलें आहे. ह्या आयुर्वेदांत व्याधि उत्पन्न होण्याचें कारण व त्याचें ज्ञान करून देणाऱ्या गोष्टी ज्यांत येतात त्या भागाला ‘ निदान ’ असें म्हटलें आहे.

आर्यवैद्यकांतील आर्ष ग्रंथांमध्यें केवळ निदान ह्या विषयांसंबंधीं स्वतंत्र असा एखादा ग्रंथ किंवा संहिता असल्याचें दिसत नाहीं. नाहीं म्हणण्यास प्रस्तुतचा अंजननिदान ग्रंथ मात्र महर्षि अग्निवेशाच्या नांवाखालीं दिसतो. पण वाग्भटानंतर माधवनिदान, हंसराजनिदान, रूपमंजरी, रोगारंभ, रोगावलि व निदानदीपिका वगैरे ग्रंथ केवळ निदानप्रकरणासंबंधीं झाल्याचें दिसतें. त्यापैकीं माधवनिदानावर संस्कृतांत दोनतीन टीका असून तोच एक ग्रंथ सटीक आणि भाषांतरसहित असा आपलेकडे छापलेला आहे. निदानदीपिका हा मूळ संस्कृतांत छापलेला असून हंसराजनिदान व अंजननिदान हे ग्रंथ हिंदी भाषेंत भाषांतरासह छापलेले आहेत. बाकीच्या ग्रंथांबद्दल अद्याप शोध लागला नाहीं.

मराठी भाषेमध्यें मात्र माधवनिदानावांचून इतर कोणत्याही निदानग्रंथाचें भाषांतर झालेलें नाहीं. “ निदाने माधवः श्रेष्ठः ” ह्या वचनाप्रमाणें माधवनिदान हा ग्रंथ सर्वमान्य व सविस्तर माहितीचा आहे; तरी संक्षेपतः सर्व रोगांचें निदान साकल्येंकरून ज्या-

मध्यें आहे, अशा ग्रंथाची जरूरी होती. ती उणीव भरून काढ-ण्याचें काम या अंजननिदान ग्रंथानें फार उत्कृष्ट केलें आहे. तेव्हां त्या ग्रंथाचें भाषांतर मराठी भाषेंत केलें असतां लोकांना फारच फायदेशीर होईल असें वाटल्यावरून, तें भाषांतर करून विद्वानां-पुढें आणलें आहे. मूळ ग्रंथ फार संक्षिप्त व व्यापक असल्यामुळें त्याचें जितकें विवेचन व्हावयास पाहिजे तितकें ग्रंथविस्तारभीती-स्तव येथें करितां आलें नाहीं. तथापि शक्य तितकें सुगम व थोड-क्यांत असें विषयाचें स्पष्टीकरण केलें आहे. राहिलेल्या दोषांबद्दल विद्वान वाचक कांहीं सूचना करितील तर पुढील आवृत्तीचे वेळीं त्यांचा अवश्य विचार करूं.

प्रस्तुत अंजननिदान ग्रंथ महर्षि अग्निवेशप्रणीत असल्याचें ग्रंथाच्या आरंभींच्या व शेवटच्या श्लोकावरून दिसतें. तथापि षट्-भिषक्संहिताकारांपैकीं आत्रेय शिष्य अग्निवेश तो ह्या ग्रंथाचा कर्ता नसावा असें पुष्कळ अनुमानांवरून सिद्ध होतें.

( १ ) पहिलें अनुमान असें कीं, आयुर्वेद इंद्रापासून पृथ्वीवर आणिल्याबद्दल जो इतिहास चरक, सुश्रुत वगैरे ग्रंथांतून आढळतो, त्यावरून अष्टांगवैद्यकापैकीं कांहीं प्रमुख अंगांला प्राधान्य देऊन जरी काहीं आर्षसंहिता–उदाहरणार्थ, अग्निवेशतंत्र ( कायचिकित्सा ), सुश्रुततंत्र ( शल्यचिकित्सा ), जनकतंत्र ( शालक्यचिकित्सा ) अशा –त्या त्या विषयावर झाल्याचें आढळतें, तरी एकएक संहिता शिकल्यानें एक अंग पूर्ण व बाकीचींहि अंगें त्या मानानें तयार होतील अशाच तऱ्हेची त्या संहितांची रचना आढळते. वैद्यकाच्या आठ अंगांपैकीं एकेकच अंगाचें प्रतिपादन केलेली संहिता आढळत नाहीं. वाग्भटापर्यंत तसा प्रकार असल्याचें ग्रंथांवरून दिसत नाहीं. पुढें मात्र एकेका विषयाबद्दल निरनिराळे ग्रंथ झाल्याचें आढळतें.

( २ ) दुसरें अनुमान म्हटलें म्हणजे आज उपलब्ध असलेल्या व चरक व दृढबल ह्यानीं संस्कार केलेल्या अग्निवेशतंत्रांत ( चरक-ग्रंथांत ) ज्या रोगांचीं नांवें देखील नाहींत, त्यांचीं निदानें अंजन-

निदानांत आढळतात. शिवाय रोगांचा अनुक्रम चरकांतील निदान-स्थान व चिकित्सास्थान ह्यांना धरून नाहीं. आत्रेयशिष्य अग्नि-वेश हाच जर ह्या अंजननिदानाचा कर्ता असता, तर चरकाच्या निदानस्थानाच्या व चिकित्सास्थानाच्या क्रमाला धरूनच या अंजन-निदानाचाही क्रम राहिला असता.

( ३ ) तिसरें अनुमान म्हणजे जर अंजननिदान हा ग्रंथ आत्रेय-शिष्य अग्निवेश यानें तयार केला असता, तर चरकावर ज्या ज्या टीकाकारांनीं टीका केल्या आहेत त्यांनीं आपल्या टीकेंत कोठें तरी या अंजननिदानाचा उल्लेख करणें जरूर होतें. इतकेंच नाहीं, तर चरकाप्रमाणें अंजननिदानावरही त्यांच्यापैकीं कोणी तरी टीका-सुद्धां लिहिली असती. पण तशी टीकाही आढळत नाहीं.

( ४ ) चवथें अनुमान असें कीं, माधवनिदान ग्रंथाच्या आरंभीं माधवानें जो रोगांचा अनुक्रम धरला आहे तसा अनुक्रम कोण-च्याही आर्षग्रंथांत वाग्भटापर्यंत धरलेला आढळत नाहीं. खुद्द वाग्भटांतही तो अनुक्रम नसून साधारणतः चरकाच्याच अनुक्रमाला कांहीं जुळता असा त्याचा अनुक्रम आहे. आणि अंजननिदानाचा अनुक्रम, चार दोन निदानें खेरीज करून बहुतेक सर्व, माधवनिदा-नाच्या अनुक्रमालाच धरून आहे. ह्या सर्व अनुमानांवरून अंजन-निदानाचा कर्ता महर्षि अग्निवेश हा आत्रेयशिष्य अग्निवेश नसून माधवनिदानकार माधवाचार्यानंतर झालेला कोणी दुसरा अग्निवेश नांवाचा वैद्य असावा असें सिद्ध होतें.

ग्रंथकार कोणीहि असो, ग्रंथाची मांडणी फारच व्यापक, व्यवस्थे-शीर व संक्षिप्त असल्यामुळें हा ग्रंथ प्रत्येक वैद्यानें संग्रहास ठेव-ण्यासारखा, इतकेंच नव्हे तर पठण करण्यासारखा आहे, ह्यांत शंका नाहीं. तेव्हां अशा ग्रंथाचा सर्वांस लाभ व्हावा ह्या हेतूनें हा ग्रंथ भाषांतरासह छापून प्रसिद्ध केला आहे.

इसलामपूर,<br>ता. २०।६।२०

लेखक,<br>दत्तो बल्लाळ बोरकर.

श्रीशंकर

# सार्थ अंजननिदान.

अबोधतिमिरच्छन्नचक्षुषां भिषजां कृते ॥
सूक्ष्मं करोत्यग्निवेशो ग्रन्थमञ्जनमाख्यया ॥ १ ॥

ज्या वैद्यांचे नेत्र अज्ञानरूप अंधकारानें आच्छादित झाले आहेत, त्यांच्यासाठीं महर्षि अग्निवेश हे हा लहानसा ( अज्ञानरूप तिमिर दूर करण्याकरितां केवळ अंजनच असा ) अंजन नांवाचा निदानग्रंथ तयार करितात.

## रोगोत्पत्तीचें कारण.

दोषरोषो रुजां हेतुस्तत्प्रकोपे तु कारणम् ॥
प्रत्येकं हीनमिथ्यातियोगः कालार्थकर्मणाम् ॥ २ ॥

वातादि दोषांचा प्रकोप हेंच रोग उत्पन्न होण्याचें कारण आहे, आणि त्या वातादि दोषांचा प्रकोप होण्याला काल ( वसंतादि ऋतु ), अर्थ ( पंचज्ञानेंद्रियांचे शब्दस्पर्शादि विषय ) आणि कर्म ( आहारविहारादि ) या प्रत्येकाचा हीनयोग, मिथ्यायोग किंवा अतियोग हें कारणं आहे.

## वातप्रकोपाचीं कारणें.

कटुतिक्तकषायपयोदहतिश्रमरूक्षहिमान्नभयानशनैः ॥
स्मरजागरशुक्करणास्रगमैरपि कुप्यति वेगवधैरनिलः ॥ ३ ॥

तिखट, कडु, तुरट, इ० रसांचें सेवन, वर्षा किंवा ग्रीष्म ऋतु, श्रम, रूक्ष व शिळें अन्न, भय, लंघन, मैथुन, जागरण, शोक,

---

१. वसंतऋतूंत वाजवीपेक्षा जास्त उन्हाळा असणें हा ऋतूचा अतियोग; मुळींच उष्णता न भासणें हा हीनयोग आणि थंडी किंवा पर्जन्य पडणें हा मिथ्यायोग. सूर्याकडे सारखें पहाणें किंवा बारीक नजरेचीं कामें पुष्कळ करणें हा दृष्टीचा अतियोग; अंधारांत असणें किंवा मुळीं डोळे झांकून बसणें हा दृष्टीचा हीनयोग व विपरीत पदार्थ ( वमनादि किंवा प्रेतसंस्कारादि पहाणें ) हा दृष्टीचा मिथ्यायोग. शक्तीपेक्षां अधिक श्रम करणें हा व्यायामाचा अतियोग, मुळींच व्यायाम न करणें हा हीनयोग व वांकड्यातिकड्या उड्या मारणें, जड ओझीं उचलून इकडे तिकडे फेंकणें हा व्यायामाचा मिथ्यायोग जाणावा.

कुस्ती, रक्त काढणें (शिरावेधादि) आणि मलमूत्रादिकांचे वेग धा-
रण करणें, यांचे योगानें वातदोष प्रकोप पावतो.

### प्रकुपित वाताचीं लक्षणें.

शिरःशंखभ्रूहृत्त्रिकविटपसंध्यस्थिकटिरुक्
विबन्धः पारुष्यं शयनहतिराध्मानचलने ॥
कडारा शोणा वा छविरपि कषायोऽस्य च रसः
श्रमो रुग्वैषम्यं कुपितमरुतो लक्षणमिदम् ॥ ४ ॥

मस्तक, दोन्ही आंख, भुवया, हृदय, माकडहाड, हातपाया-
दिकांचे सांधे, हाडें व कंबर इतक्या ठिकाणीं वेदना, मलावरोध,
अंग खरखरीत होणें, झोप न येणें, पोट फुगणें, कंप, अंग श्याम-
वर्ण किंवा तांबूस होणें, तोंड तुरट असणें, आयास वाटणें व केव्हां
अंग दुखणें केव्हां न दुखणें, हीं प्रकुपित वाताचीं लक्षणें होत.

### पित्तप्रकोपाचीं कारणें.

तिलसुक्तसुरादधिमीनशरत्कटुतीक्ष्णपटूष्णरुडम्लतपैः ॥
रतिघस्रनिशार्धविदाहकरैरपि कुप्यति पित्तमुपोषणतः ॥ २ ॥

तीळ, कांजी, मद्य, दहीं व मासे यांचें अतिसेवन, शरदृतु,
आंबट, तिखट व खारट पदार्थांचें सेवन, रागावणें, ऊन घेणें, मैथुन,
मध्यरात्रीं खाणें किंवा विदाहकारक (घशाशीं येणारे) पदार्थ
खाणें यायोगानें पित्त प्रकुपित होतें.

### पित्तप्रकोपाचीं लक्षणें.

भ्रमो दाहो मूर्च्छा मलशिथिलता स्वेददरणं
प्रलापः पीतत्वं मुखनयनविण्मूत्रनखरे ॥
मदस्तृट्तिक्तोष्णः पटुकटुरसः पाण्डुरहिता
द्युतिः पाकश्वेत्याकृतिरपि पित्तस्य सरुपः ॥ ६ ॥

भोवळ, दाह, मूर्च्छा, शौचास पातळ, घाम, त्वचा विदलित
होणें, बडबड, तसेंच तोंड, डोळे, मलमूत्र व नखें यांना पिवळटपणा,
उन्मत्तपणा, तहान, तोंड तिखट, खारट किंवा कडवट असणें,
अंग पांढरेपणा खेरीज करून इतर रंगाचें होणें आणि तोंडावर व
अंगावर पुटकुळ्या उठणें हीं लक्षणें पित्तप्रकोपापासून होतात.

## कफप्रकोपाचीं कारणें.

दधिदुग्धनवीनजलान्नहिताध्यशनाम्लपटूरसगाज्यतिलैः ।
गुरुमत्स्यवसन्तदिवाशयनैर्मधुरैरपि रोषमुपैति कफः ॥ ७ ॥

दहीं, दूध, नवें पाणी, शिळें अन्न, जेवणावर जेवण करणें, आंबट व खारट पदार्थांचें सेवन, बसून राहणें, तूप, तेल व पचनास जड असे पदार्थ किंवा मासे यांचें सेवन, वसंतऋतु, दिवसा झोंप घेणें व मधुर पदार्थ जास्त खाणें या कारणांनीं कफ प्रकुपित होतो.

## कफप्रकोपाचीं लक्षणें.

गुरुत्वं स्तैमित्यं श्वयथुचिरकर्तृत्वशयने।
मलाधिक्यं कण्डूररुचिरुपलेपः शिशिरता ॥
अपक्तिस्तृप्तिश्चाऽस्मृतिरिति बलासस्य सरुषः ।
स्फुटं लिङ्गं स्वादुः पटुरपि रसो भा च धवला ॥ ८ ॥

अंगाला जडत्व, अंग ओलसर वाटणें, सूज, चेंगटपणा, अति झोप, मलमूत्रादि फार, अंगाला कंडू, तोंडाला अरुचि, घामाच्या ओलसरपणानें अंगाला लेपटल्यासारखें वाटणें, जिभेला कफानें लेपटल्यासारखें वाटणें, थंडी वाजल्यासारखें वाटणें, अपचन, अन्नावर इच्छा न होणें, स्मरणशक्ति नाहींशी होणें, तोंड खारट किंवा कडवट होणें, आणि अंग पांढुरकें होणें हीं लक्षणें कफप्रकोप झाला असतां होतात.

## रोगज्ञानाच्या साधनाचे प्रकार.

हेतुप्राग्रूपरूपोपशयाप्तिभिरिहामयः ।
ज्ञेयो रूपेण चैकेन मुख्यमेतेषु तद्यतः ॥ ९ ॥

हेतू[1], पूर्वरूप, रूप, उपशय, व संप्राप्ति अशा पांच प्रकारांनीं रोगज्ञान करून घ्यावें. केवळ रोगस्वरूपावरूनही रोगज्ञान करून

---

१ हेतुः—म्हणजे रोग उत्पन्न होण्याचें आदिकारण.

प्राग्रूपः—म्हणजे रोग पूर्ण स्वरूपांत दिसण्यापूर्वी त्याचीं जीं लक्षणें दिसतात तीं. उदाहरण जांभया येणें, डोळे जळजळणें इ० ज्वराचीं पूर्वचिन्हें.

रूपः—रोगाचीं सर्व लक्षणें प्रगट दिसूं लागलीं म्हणजे त्यांस रूप म्हणतात.

उपशयः—म्हणजे ज्या प्रकारच्या औषधान्नविहारानें रोगशांति होते तो.

संप्राप्तिः—अमुक एक प्रकारानें दुष्ट झालेला वातादि दोष अमुक एक प्रकारानें संचार करीत असतां अमुक एक रोग उत्पन्न होतो, ही जो रो-

घेतां येतें. कारण वरील पांच प्रकारांत तें मुख्य आहे.

---

## ज्वरनिदान.

### ज्वराची संप्राप्ति.

दोषोऽजीर्णाज्ज्वरं कुर्यात् क्षिप्त्वाऽग्निं कोष्ठतस्त्वचि ।
सोऽष्टधा तैः पृथक् द्वंद्वसर्वैरागन्तुजोऽपि च ॥ १० ॥

अजीर्णापासून उत्पन्न झालेला दोष जठराग्नीला कोठ्यांतून बाहेर काढून त्वचेंत आणून सोडतो. त्यामुळें सर्व अंग तापतें. त्यास ज्वर असें म्हणतात. तो ज्वर वातादि तीन दोषांनीं तीन प्रकारचा, दोन दोन दोषांच्या संयोगानें तीन प्रकारचा, त्रिदोषापासून एक, आणि आगंतुक एक मिळून आठ प्रकारचा आहे.

### ज्वराचें पूर्वरूप.

जृम्भाङ्गमर्दावरतिदृग्दाहौ गौरवारुची ।
पृथक् ज्वराणां प्राग्रूपं द्वित्रिजे द्वित्रिलक्षणम् ॥ ११ ॥

( १ ) जांभया येणें, अंग दुखणें किंवा मोडून आल्यासारखें वाटणें; ( २ ) मनाला उल्हास नसणें, डोळ्यांची आग होणें; व ( ३ ) अंगाला जडत्व आणि तोंड बेचव होणें हीं क्रमानें वातपित्तकफांपासून उत्पन्न झालेल्या वेगवेगळ्या ज्वरांचीं तीन पूर्व रूपें आहेत. दोन दोषांच्या मिश्र लक्षणांवरून द्विदोषजनित ज्वराचें पूर्वरूप जाणावें व तीनही दोषांचीं लक्षणें असलीं म्हणजे त्रिदोषजन्य ज्वराचें पूर्वरूप जाणावें.

### वातज्वराचें लक्षण.

कम्पः कण्ठोष्ठविट्शोषोऽक्षवो मूर्धोदराङ्गरुक् ।
वैषम्याऽस्वप्नवैरस्यं जृम्भा वातज्वराकृतिः ॥ १२ ॥

अंग कापणें, घशांत कोरड, ओठ सुकणें, मळ शुष्क होणें, शिंक न येणें, डोकें दुखणें, पोटांत दुखणें, अंग ठणकणें, तापाचा वेग कमीजास्त होणें, झोंप न येणें, तोंड बेचव होणें आणि जांभया येणें, हीं वातज्वराचीं लक्षणें होत.

---

ची उपपत्ति त्यास संप्राप्ति असें म्हणतात.

( ह्याची विशेष माहिती आमच्या माधवनिदानांत पहावी.—प्रकाशक.)

### पित्तज्वराचें लक्षण.

पीतता दाहतृट्स्वेदो मूर्च्छाऽल्पस्वप्नतिक्तता ।
वमिभ्रमप्रलापाश्च रेकः पित्तज्वराकृतिः ॥ १३ ॥

अंगाला पिवळेपणा[1], अंगाचा दाह होणें, तहान, घाम येणें, मूर्च्छा, झोप थोडी, तोंडाला कडवटपणा, ओकारी, घेरी, वडबड व रेच होणें हीं पित्तज्वराचीं लक्षणें होत.

### कफज्वराचें लक्षण.

स्तैमित्योत्क्लेदमाधुर्यं प्रतिश्यारुचिगौरवम् ।
कासालस्ये तृप्तिशौक्ल्यं शैत्यं श्लेष्मज्वराकृतिः ॥ १४ ॥

अंग ओलसर वाटणें, मळमळणें, तोंड गुळमट होणें, पडसें, अरुचि, अंगाला जडत्व, खोकला, आळस, अन्नावर इच्छा नसणें, अंगाची कांति पांढुरकी होणें व थंडी वाजणें हीं कफज्वराचीं लक्षणें होत.

### वातपित्तज्वरलक्षण.

कण्ठस्यशोषस्तृण्मूर्च्छा दाहोऽस्वप्नो वमिर्भ्रमः ॥
तमः पर्वशिरोरुक् च वातपित्तज्वराकृतिः ॥ १५ ॥

कंठ आणि तोंड कोरडें होणें, तहान, बेशुद्धि, दाह, झोंप न येणें, ओकारी, भ्रांति, डोळ्यापुढें अंधारी येणें आणि सांधे व मस्तक दुखणें हीं वातपित्तज्वराचीं लक्षणें आहेत.

### वातकफज्वरलक्षण.

स्तैमित्यं कासन्तापौ गौरवं पर्वमूर्धरुक् ।
स्वापोऽस्वेदः प्रतिश्यायो वातश्लेष्मज्वराकृतिः ॥ १६ ॥

अंग ओलसर वाटणें, खोकला, दाह होणें, जडत्व, सांधे व डोकें दुखणें, झोंप येणें, अंगाला घाम न येणें व पडसें हीं लक्षणें वातकफात्मक ज्वरामध्यें होतात.

### पित्तकफज्वरलक्षण.

शीतं दाहो मुहुस्तन्द्रा मोहः कासोऽरुचिश्च तृट् ।

---

१ ' पीतता ' या पदानें केवळ अंगच पिवळट होतें असें नसून मळ, मूत्र व नेत्र यांनाही पिवळेपणा असतो, असें समजावें. कारण माधवनिदानांत म्हटलें आहे:—" पीतविण्मूत्रनेत्रत्वक् पैत्तिके..." अर्थ—पित्तज्वरांत विष्ठा, मूत्र, डोळे, त्वचा हीं पिवळीं असतात.

लिप्ततिक्तास्यता पित्तबलासज्वरलक्षणम् ॥ १७ ॥

वरचेवर थंडी वाजणें व दाह होणें, तंद्रा म्हणजे झोंपेंत असल्यासारखें स्वस्थ डोळे मिटून पडणें, ग्लानि, खोकला, तोंडाला चव नसणें, तहान आणि कफानें तोंड चिकट व कडवट होणें, हीं लक्षणें पित्तकफात्मक ज्वरांत होतात.

### सन्निपात-ज्वर-लक्षण.

खरा जिह्वाऽक्षिणी भुग्ने साश्रिरक्ते तृडस्थिरुक् ।
चिक्कतेहा स्वेदनिद्रा शीतदाहाव्यवस्थितिः ॥ १८ ॥
तन्द्रा प्रलापो मोहाङ्गस्रस्तता कण्ठशूकता ।
रक्तष्ठीवनमित्यादिः सन्निपातज्वराकृतिः ॥ १९ ॥

जीभ खरखरीत, दृष्टि वक्र होणें, डोळ्यास गळती लागणें, डोळे लाल होणें, तहान, हाडें ठणकणें, वेड्यावांकड्या चेष्टा करणें, घाम फार अगर मुळींच न येणें, झोंप फार किंवा मुळींच नसणें, केव्हां थंडी वाजणें तर केव्हां अंगाची तलखी होणें, डोळ्यांवर झांपड, बडबड, भ्रांति, अंग गळल्यासारखें ढिलें पडणें, घशांत कूस आडकल्यासारखें वाटणें व रक्ताची वांति होणें इत्यादि लक्षणें सन्निपातज्वरांत होतात.

### सन्निपातज्वराचें असाध्य लक्षण.

अभिन्यासः समस्तैस्तैर्ध्वस्तसर्वेन्द्रियक्रियः ।
सन्निपातज्वरोऽसाध्यो दोषवृद्ध्याऽग्निहानितः ॥ २० ॥

सर्व लक्षणयुक्त सन्निपात झाला असतां त्यास अभिन्यास म्हणतात. त्यांत सर्व इंद्रियांचे व्यापार बंद होतात. असा हा सन्निपातज्वर जठराग्नीचा नाश होऊन दोषांची वृद्धि झाली असतां असाध्य होतो.

सप्तदशद्वादशाहाद्धानिर्वा वृद्धिरस्य तैः ॥
तत्तद्द्विगुणघस्रैस्तु तन्मर्यादा स्मृता क्रमात् ॥ २१ ॥

वातपित्तकफाधिक्यानें उत्पन्न झालेला सन्निपात अनुक्रमें सात, दहा किंवा बारा दिवसांत वाढतो किंवा कमी होतो. तथापि त्याची वाढण्याची किंवा कमी होण्याची मुदत—वाताची चौदा दिवस, पित्ताची वीस दिवस व कफाची चोवीस दिवस असते.

## सन्निपाताचा साध्यासाध्यविचार.

सन्निपातज्वरस्यादिमध्यान्ते कर्णमूलयोः ॥
शोथोऽसाध्यः कष्टसाध्यः सुखसाध्यः क्रमेण च॥२ ॥

सन्निपातज्वर झाला असतां प्रथम, मध्यंतरीं अगर अखेरीस दोन्ही कानांच्यामागे (दोहोंपैकीं कोणत्याही एका कानाच्या गळ्याचे ठिकाणीं; श्लोकांत 'मूलयोः' असा पाठ आहे) सूज येते. सन्निपात होतांच ही सूज आल्यास तो असाध्य होतो, मध्यंतरीं आल्यास कष्टसाध्य होतो व शेवटीं आल्यास सुखसाध्य होतो.

## विषमज्वरांचीं नांवें व संप्राप्ति.

सन्ततः सततोऽन्येद्युस्तृतीयकचतुर्थकौ ॥
सन्दुष्यास्रसावस्रं क्रव्यं मेदोऽस्थि मज्ज च ॥ ३ ॥

संतत, सतत, अन्येद्यू, तृतीयक व चातुर्थिक असे हे पांच प्रकारचे विषमज्वर रस व रक्त यांना दूषित करून व रक्त, मांस, मेद, अस्थि व मज्जा ह्या धातूंचा आश्रय करून उत्पन्न होतात.

## विषमज्वरांचे भेद.

तद्भेदा विषमाः स्युस्ते शीतदाहादयो ज्वराः ॥

ह्या ज्वराचे शीतपूर्व व दाहपूर्व असे दोन भेद आहेत.

सन्तत्या संततस्तिष्ठेत्त सप्तदशरव्यहान् ॥ २४ ॥

जो ज्वर वात, पित्त व कफ ह्यांच्या प्राधान्यानें अनुक्रमें सात, दहा किंवा बारा दिवस सारखा राहातो, तो संतत ज्वर होय.

द्वौ कालौ सततोऽन्येद्युरेकं कुर्यादहर्निशम् ॥
मुक्त्वैकाहं तृतीयोऽथ द्व्यहं त्यक्त्वा चतुर्थकः ॥ २५॥

सतत ज्वर दिवसांतून व रात्रींतून मिळून दोन वेळ येतो. ह्यालाच एकाहिक ज्वर म्हणतात. आज येऊन पुन्हा उद्यां म्हणजे दुसऱ्या दिवशीं येणारा जो ज्वर त्याला अन्येद्यु म्हणजे द्व्यहिकज्वर असें म्हणतात. एक दिवस मध्यें टाकून म्हणजे तिसऱ्या दिवशीं येणारा जो ज्वर त्याला तृतीयक ज्वर म्हणतात. आणि दोन दिवस मध्यें टाकून येणाऱ्या ज्वरास चातुर्थिक ज्वर म्हणतात.

## विपरीतविषमज्वरलक्षण.

घटीः पञ्चाशदन्येद्युः स्वेहत्र्यंहस्तु तृतीयकः ॥

त्र्यहं चतुर्थो व्याप्नोति त्रय एते विपर्ययाः ॥ २६ ॥

जो ज्वर साऱ्या अहोरात्रींत ( कोण याही १० घटका सोडून ) पन्नास घटका सारखा राहतो, तो एक प्रकारचा अन्येद्यु ज्वर समजावा. एक दिवस आड करून न येतां जो ज्वर तो मधला दिवस व्यापून रहातो, व आधल्या दिवसांतील कांहीं काळ व पुढल्या दिवसांतील कांहीं काळ नसतो, तो तृतीयकाचा एक प्रकार आहे. त्याचप्रमाणें मधले दोन दिवस सारखा राहून आधींच्या व शेवटच्या दिवशीं जो ज्वर नसतो, त्यालाही एक प्रकारचा चातुर्थिक ज्वरच म्हणतात. हे तीनही ज्वर अनुक्रमें द्व्यहिक, त्र्यहिक व चातुर्थिक यांचे विपर्यास आहेत.

### रसादिधातुगत ज्वरलक्षण.

हृद्गुरुस्रवमिर्दाहो वैगन्ध्यं चास्थिरुक् क्रमः ॥
शुक्रोत्सर्गश्चेति लिङ्गं क्रमाद्धातुगते ज्वरे ॥ २७ ॥

( १ ) हृदयामध्यें दुखणें, ( २ ) रक्ताची गुळणी येणें, ( ३ ) अंगाचा दाह, ( ४ ) शरीरास दुर्गंधी, ( ५ ) हाडें ठणकणें, ( ६ ) ग्लानि फार, आणि ( ७ ) लघवींतून अगर स्वप्नावस्थेंत किंवा एरवीं कारण नसतांनाही वीर्यस्राव होणें हीं सात लक्षणें अनुक्रमें रसगत, रक्तगत, मांसगत, मेदोगत, अस्थिगत, मज्जागत व शुक्रगत अशा सात ज्वरांचीं जाणावीं.

साध्यावाद्यौ कष्टसाध्यास्तत्परोऽन्त्यो न सिद्ध्यति ॥

रसगत व रक्तगत हे दोन ज्वर साध्य आहेत. मांसगत, मेदोगत, अस्थिगत व मज्जागत हे चार ज्वर कष्टसाध्य आहेत; आणि शुक्रधातुगत ज्वर असाध्य आहे.

### प्रलेपक ज्वराचें लक्षण.

मन्दोऽतिगौरवस्वेदो ज्वरो नित्यं प्रलेपकः ॥ २८ ॥

जो ज्वर सारा दिवस सारखा भरलेला असतो, तथापि त्याचा वेग मंद असतो, अंग फार जड वाटतें व घाम येतो, अशा ज्वराला प्रलेपक ज्वर म्हणतात.

### आगंतुक ज्वराचे प्रकार.

चतुर्धाऽऽगन्तुजः शापाभिचारावेशघातजः ।
पूर्वयोर्भूरिविस्फोटमोहावावेशजे तु रुट् ॥ २९ ॥

गुरुदेवतादिकांच्या अवकृपेनें जो ज्वर येतो, त्याला शापज ज्वर म्हणतात. जारजमारणादि प्रयोगांनीं जो ज्वर येतो, त्याला अभिचारज ज्वर म्हणतात. काम, क्रोध, भूत, दृष्टि वगैरे कारणांनीं येणाऱ्या ज्वरास आवेशज ज्वर म्हणतात. आणि लाकूड, धोंडा, शस्त्र वगैरेच्या आघातानें येणाऱ्या ज्वराला अभिघातज ज्वर म्हणतात. हे चारी ज्वर आगतुक आहेत. त्यांत शापजन्य व अभिचारजन्य ज्वरांत अंगावर अतिशय फोड किंवा पुटकुळ्या येतात व मोह म्हणजे ग्लानि फार असते व आवेशजन्य ज्वरांत अंग ठणकतें.

### कामज, विषज व अभिघातज ज्वराचें लक्षण.

तत्तद्भूतस्य कामोत्थे ह्रीधीस्वप्नहतिर्ज्वरे ।
दाहातिसारौ क्ष्वेडोत्थे यथास्वं घातजं वदेत् ॥ ३० ॥

कामज्वरामध्यें लज्जा, बुद्धि व निद्रा ह्यांचा ऱ्हास होतो. विष पोटांत गेल्यानें जो ज्वर येतो त्यांत दाह आणि अतिसार हे विकार असतात. आणि अभिघातजन्य ज्वरामध्यें ज्या प्रकारचा अभिघात असेल त्याला अनुलक्षून लक्षणें होतात.

### ज्वराचें असाध्य लक्षण.

बहुहेतूपद्रवोऽतिक्षीणधात्विद्रियो ज्वरः ।
असाध्यः शीतलस्वेदो गात्रान्तर्दाहकृच्च यः ॥ ३१ ॥

पुष्कळ कारणांनीं झालेला, सर्व उपद्रवांनीं युक्त, व ज्याचे सर्व रसादि धातु क्षीण झाले आहेत किंवा ज्याचें शुक्र क्षिण झालें आहे किंवा ज्याचीं इंद्रियें क्षीण झालीं आहेत, त्याचा ज्वर असाध्य असतो. तसेंच ज्याला थंड घाम येत आहे किंवा ज्याला अंतर्दाह होत आहे, त्याचाही ज्वर असाध्य असतो.

### ज्वराचें साध्यासाध्यत्व.

लघुर्गुरुर्निरामश्च सामः प्राकृतवैकृतौ ।
बहिरन्तर्वेगिनौ च साध्यासाध्यौ क्रमाज्ज्वरौ ॥ ३२ ॥

लघु ( हलका ) ज्वर साध्य व गुरु ( कडक ) ज्वर असाध्य, निरामज्वर साध्य व सामज्वर असाध्य, प्राकृतज्वर साध्य, व वैकृत ज्वर असाध्य, बहिर्वेग ज्वर साध्य व अंतर्वेग ज्वर असाध्य, ह्याप्रमाणें ज्वरांचें साध्यासाध्यत्व जाणावें.

लघु, गुरु, प्राकृत व वैकृत ज्वरांचें लक्षण.

लघुरल्पोपद्रवः स्यादनेकोपद्रवो गुरुः ।
वर्षाशरद्वसन्तेषु प्राकृतोऽन्यस्तु वैकृतः ॥ ३३ ॥

लघु ज्वर अल्प उपद्रवात्मक असतो व गुरु ज्वर अनेक उपद्रवांनीं युक्त असतो. वर्षाऋतूंत येणारा वातज्वर, शरदृतूंत येणारा पित्तज्वर आणि वसंतऋतूंत येणारा कफज्वर हे प्राकृत ज्वर समजावे व ह्याव्यतिरिक्त जे ज्वर ते वैकृत ज्वर समजावे.

साम व निराम ज्वराचें लक्षण.

हृल्लासापाकलालाक्षुत्तन्द्रारुच्यङ्गगौरवैः ।
वैरस्यालस्यातिसूत्रैः सामोऽन्यस्मान्निरामकः ॥ ३४ ॥

ओकारी, अपचन, मळमळ, भूक न लागणें, ग्लानि, अरुचि, अंगाला जडत्व, विरसपणा, आळस व लघवी जास्त होणें ह्या लक्षणांनीं युक्त अशा ज्वरास सामज्वर म्हणतात. ह्याच्या उलट लक्षणांनीं युक्त असा जो ज्वर तो निरामज्वर[1] समजावा.

अंतर्वेग व बहिर्वेग ज्वराचें लक्षण.

अंतर्दाहः प्रलापस्तृट् सन्धिरुक् विड्ग्रहो भ्रमः ।
श्वासास्वेदौ चिह्नमन्तर्वेगिनोऽन्यस्य चान्यथा ॥ ३५ ॥

शरीराचा आंतून दाह होणें, बडबड, तहान, सांधे दुखणें, मलावरोध, भ्रम, श्वास व घाम हीं अंतर्वेग ज्वराचीं लक्षणें होत. बहिर्वेगज्वराचीं[2] लक्षणें ह्याच्या उलट जाणावीं.

ज्वराचे उपद्रव.

विरेको विड्ग्रहो वा तृट् कासः श्वासोऽङ्गरुग्वमिः ।

---

१. निरामज्वराचीं लक्षणें—भूक लागणें, ओकारी न येणें, अंग हलकें होणें, ज्वर कमी असणें, अधोवायु व शिंक यांची प्रवृत्ति व हुषारी वाटणें.

२. बहिर्वेगज्वराचीं लक्षणें:—शरीराचा बाहेरून दाह होणें व तहान वगैरे सौम्य असणें.

हिक्का मूर्च्छाऽरुचिश्चापि ज्वरस्योपद्रवा दश ॥ ३६ ॥

रेच होणें किंवा मलावरोध होणें, तहान, खोकला, सर्व अंग दुखणें, ओकारी, उचकी, मूर्च्छा व अरुचि असे हे ज्वराचे दहा उपद्रव आहेत.

### धातुपाक-ज्वराचें लक्षण.

अस्वप्नाऽरुच्यरतितृट्स्तम्भवीर्याङ्गगौरवम् ।
यन्त्रणान्नाभिहृन्मध्ये रुक् चाङ्गे धातुपाकिनः ॥ ३७ ॥

निद्रानाश, अरुचि, असमाधान, तहान, मलाचा अवरोध, अशक्तता, अंगाला जडत्व आणि हृदय व नाभि ह्यांमध्यें हातानें दाबलें असतां पीडा होणें हीं लक्षणें धातुपाक-ज्वरामध्यें होतात.

### पच्यमान व दोषपाक-ज्वराचें लक्षण.

भ्रमातिज्वरतृट्श्वासः पच्यमानज्वराकृतिः ।
दोषज्वराङ्गलघुता दोषपाकस्य लक्षणम् ॥ ३८ ॥

भ्रम, ज्वर फार, तहान व श्वास हीं लक्षणें पच्यमान (पक्व होत असणाऱ्या) ज्वरामध्यें असतात; आणि दोषांचा जोर कमी होणें व ज्वर हलका येणें हीं दोषपाक ज्वराचीं (दोष पक्व झाल्याचीं) लक्षणें होत.

### ज्वरमुक्तीचें लक्षण.

दाहस्वेदौ भ्रमस्तृष्णा कम्पो विड्भिदसंज्ञता ॥
कूजनं चातिवैगन्ध्यमाकृतिर्ज्वरमोक्षणे ॥ ३९ ॥

अंगाचा दाह, घाम येणें, भ्रम, तहान, कांपरें भरणें, मळ पातळ होणें, बेशुद्धि असणें, विव्हळणें व शरीराला अतिशय दुर्गंधी येणें हीं लक्षणें ज्वरमुक्तीच्या वेळीं (ज्वराचे अखेरीस) होतात.

देहो लघुर्मुखे पाकः स्वेदः करणसौष्ठवम् ॥
कण्डूः क्षवो बुभुक्षा च विगतज्वरलक्षणम् ॥ ४० ॥

अंग हलकें वाटणें, तोंडाला जर उतणें, घाम येणें, इंद्रियें सुप्रसन्न असणें, अंगाला—विशेषतः डोक्याला खाज सुटणें, शिंका येणें व भूक लागणें हीं ज्वर गेल्याचीं लक्षणें होत.

## अतिसारनिदान.

वृद्धः सविड्रसः क्षिप्तवह्निर्वातातिसारितः ॥
अतिसारः स षोढा तैः पृथक् सर्वैः शुचामतः ॥४१॥

शरीरामध्यें वाढलेला रसधातु, अग्नि मंद झाल्यामुळें मलमिश्रित होऊन, अपान वायूकडून गुदमार्गानें बाहेर सारला जातो, त्याला अतिसार असें म्हणतात. हा अतिसार वात, पित्त व कफ ह्या दोषांनीं तीन प्रकारचा, त्रिदोषापासून एक, शोकजन्य एक व आमजन्य एक, असा सहा प्रकारचा आहे.

### वातादिजनित अतिसाराचें लक्षण.

फेनरूक्षारुणं वातात्पित्तात्पीतारुणासितम् ॥
कफात्सान्द्रं श्वेतहिमं वर्चः सर्वैस्तु सर्वरुक् ॥ ४२ ॥

वातजनित अतिसारांत रूक्ष, फेसयुक्त व तांबूस वर्णाचें असें शौचास होतें; पित्तजनित अतिसारामध्यें पिवळट, तांबूस व श्यामवर्ण असें शौचास होतें; व कफापासून दाट, पांढुरवर्ण व थंड असें शौचास होतें. आणि सर्व दोषांपासून होणाऱ्या म्हणजे त्रिदोषजन्य अतिसारामध्यें तीनही दोषांचीं मिश्र लक्षणें असतात.

### शोकजनित अतिसाराचें लक्षण.

शोचतो विट् सविड् वाऽस्रं बाष्पक्षुद्रोष्मणेरितम् ॥
सृजत्यजाणार्त्तश्चित्रं मुहुर्मुहुः सशब्दरुक् ॥ ४३ ॥

शोक करणाऱ्या मनुष्याच्या अश्रूपासून उत्पन्न झालेला ऊष्मा (तेज) कोठ्यामध्यें प्रवेश करून (अग्निमांद्यामुळें उत्पन्न होणाऱ्या) अजीर्णाच्या योगानें केवळ मल किंवा मलमिश्रित रक्त वरचेवर बाहेर सोडतो. त्याला चित्रविचित्र रंग असतात. शौचास होतांना शब्द होतो व कळ किंवा मुरडा होतो.

### रक्तातिसार व प्रवाहिका यांचें लक्षण.

अतिसारी सृजत्यस्रं पित्तलाहारसेवनात् ॥
अजस्रं विड्वातकफात्प्रवहेच्चेत्प्रवाहिका ॥ ४४ ॥

अतिसारी मनुष्यानें पित्तकारक पदार्थांचें अतिसेवन केल्यामुळें याला रक्त पडूं लागतें, तेव्हां त्यास रक्तातिसार असें म्हणतात.

वातकफांच्या प्रकोपामुळें वरचेवर थोडा थोडा ( कफमिश्रित ) मळ एकसारखा पडत असतो, तेव्हां त्यास प्रवाहिका असें म्हणतात.[1]

### अतिसाराचें असाध्य लक्षण.

वमिः कृच्छ्रं ज्वरः कासः श्वासस्तृण्मोहशोथरुक् ॥
हिक्काऽरुचिश्चेति लिङ्गं मरणायातिसारिणः ॥ ४५ ॥

ओकारी, कष्टानें थोडें थोडें लघवीला होणें, ताप, खोकला, श्वास, तहान, विस्मृति, सूज, पोटांत दुखणें, उचकी आणि अरुचि हीं लक्षणें अतिसाराच्या रोग्याला झालीं असतां तो वांचणार नाहीं असें समजावें.

---

## ग्रहणीनिदान.

गतेऽतिसारेऽप्यामेन दुष्टा चेद्ग्रहणी मुहुः ॥
वर्चो मुञ्चत्याममेवोच्यतेऽसौ ग्रहणीगदः ॥ ४६ ॥

अतिसार गेल्यावर ( अपथ्य आहारामुळें ) आमरस ( वाजवी-पक्षां जास्त ) उत्पन्न होऊन त्यामुळें ग्रहणी दूषित झाली तर ती वरचेवर अपक्व मळ बाहेर सोडते. त्याला ग्रहणी किंवा संग्रहणी रोग असें म्हणतात.

### संग्रहणीचे भेद.

कुप्यति ग्रहणी नित्यं दिवा भूयो रुजाऽऽमरुक् ॥
साऽन्या संग्रहणीनाम्ना यामं संगृह्य मुञ्चति ॥ ४७ ॥

ग्रहणी नित्य दिवसा प्रकुपित होऊन वरचेवर शूळ व आम यांनीं युक्त शौचास करते. ही ग्रहणी खालेलें अन्न एक प्रहरपर्यंत धारण करून शौचावाटे आमरूपानें बाहेर सोडते. ह्यालाही एक प्रकारची संग्रहणी म्हणतात.

### संग्रहणीचे उपद्रव.

शोथाग्निमान्द्यवैवर्ण्यज्वरापाकारुचिक्षयाः ॥
तृड्वीर्यरुगाध्मानोद्गाराः स्युर्ग्रहणीगदे ॥ ४८ ॥

सूज, भूक न लागणें, अंगाचा वर्ण बदलणें, ज्वर, अन्नाचें

---

१ प्रवाहिकेंत कफदोषानें मळाबरोबर कफ पडतो व वातानें मुरडा होतो. केव्हां केव्हां मुरडा न होऊन नुसता कफच पडतो.

पचन न होणें, अरुचि, रसमांसवीर्यादिकांची क्षीणता, तहान, बल-हीनता, पोटांत दुखणें, पोट फुगणें व ढेकर येणें, हे विकार संग्रहणी रोगामध्यें होतात.

संग्रहणीचे भेद व तिचें असाध्य लक्षण.

पृथक् सर्वैश्चतुर्धाऽसौ तल्लिङ्गमतिसारवत् ॥

वात, पित्त व कफ ह्या तीन दोषांनीं वेगवेगळी तीन प्रकारची व त्रिदोषापासून एक प्रकारची मिळून संग्रहणी चार प्रकारची आहे. हिचीं चिन्हें अतिसाराप्रमाणेंच असतात.

विडामं पूत्यप्सु मज्जेत्सद्रवस्निग्धशब्दरुक् ॥ ४९ ॥

अपक्व मळ होणें, मळाला घाण येणें, मळ पाण्यांत बुडणें, मळाला स्निग्धपणा असणें, मळ पातळ होणें व शौचास होतांना कळ व शब्द होणें हें असाध्य संग्रहणीचें लक्षण आहे.

---

अर्शोनिदान ( मूळव्याधीचें लक्षण. )

त्वङ्मांसमेदः सन्दूष्य गुदेऽर्शांस्यङ्कुरान्मलाः ॥
कुर्युः षोढा पृथक् दोषाः सर्वैर्द्वे सहजास्रजे ॥ ५० ॥

वातादि दोष त्वचा, मांस व मेद ह्यांना दूषित करून गुदाच्या ठिकाणीं अर्श म्हणजे मोड उत्पन्न करितात. ते वात, पित्त व कफ ह्या तीन वेगवेगळ्या दोषांनीं तीन प्रकारचे, त्रिदोषापासून एक, सहज ( जन्मापासूनच असणारे; हे बीजदोषानें व पूर्वकर्मानें होतात.) एक व रक्तजन्य एक मिळून एकंदर सहा प्रकारचे आहेत.

मूळव्याधीचे उपद्रव.

शोथाग्निमान्द्यविष्टम्भसक्थिपीडाऽल्पविट्कता ॥
पाण्डुतास्रक्षयाबल्याध्मानोद्गारा रुजोऽर्शसाम् ॥ ५१ ॥

सूज, अग्निमांद्य, मलाचा खडा बनणें, मांड्या दुखणें, शौचास थोडें होणें, चेहऱ्यावर पांढुरकी, शरीरांतील रक्त कमी होणें, बल-हीनता, पोट फुगणें व ढेकर हे उपद्रव मूळव्याधीमध्यें असतात.

मूळव्याधीचें लक्षण.

प्रागुक्तदोषचिह्नैस्तु दोषानर्शस्सु लक्षयेत् ॥
त्रिदोषचिन्हं सहजमस्रस्रावि तदस्रजम् ॥ ५२ ॥

मागें सांगितलेल्या कारणांवरून व लक्षणांवरून मूळव्याधीच्या वातादि दोषसंभवाची परीक्षा करावी. त्रिदोषात्मक मूळव्याधीमध्यें वातादि तीनही दोषांचीं चिन्हें असतात. तींच लक्षणें सहज मूळव्याधीमध्यें असतात. ज्या मूळव्याधीमध्यें रक्त पडतें, तिला रक्त-मूळव्याध असें म्हणतातात.

स्थानपरत्वें मूळव्याधीचें साध्यासाध्यलक्षण.

बाह्यमध्यान्त्यवलिजान्येकद्वित्रिमलानि च ॥
तानि साध्यानि कष्टानि न साध्यानि वदेत्क्रमात् ॥ ५३ ॥

गुदमार्गाच्या तीन वळ्यांपैकीं बाह्य वळीच्या ठिकाणीं असणारी मूळव्याध एकदोषात्मक असते. ती साध्य असते. दुसऱ्या मध्यवळीच्या ठिकाणीं असते ती दोन दोषांनीं युक्त असल्यामुळें कष्टसाध्य असते, व तिसऱ्या आंतील वळीवर असणारी मूळव्याध त्रिदोषात्मक असल्यामुळें असाध्य असते.

---

## अजीर्णनिदान.

अजीर्णं भुक्तिवैषम्याद्रेको वान्तोऽस्य विड्ग्रहः ॥
स्युर्विष्टब्धविदग्धामाख्यान्यजीर्णानि वै क्रमात् ॥ ५४ ॥
रसशेषश्चतुर्थं तत्

विषमासनामुळें ( जेवणावर पुन्हां जेवणें, दूध मासे वगैरे विरुद्धान्न खाणें किंवा भुकेपेक्षां न्यूनाधिक जेवणें ह्याला भुक्तिवैषम्य किंवा विषमाशन म्हणतात. ) अन्न पचन होत नाहीं. त्यामुळें रेच होतात, वांति होते, किंवा शौचाचा अवरोध होतो. त्याला अजीर्ण असें म्हणतात. तें वातदोषामुळें विष्टब्धाजीर्ण, पित्तदोषामुळें विदग्धाजीर्ण, आणि कफदोषामुळें आमाजीर्ण असें तीन प्रकारचें, व अन्नपचनानंतर उत्पन्न झालेला अन्नरस शिल्लक राहिल्यास तें चवथें रसशेषाजीर्ण, असें अजीर्ण चार प्रकारचें आहे.

विष्टब्धादि अजीर्णाचीं लक्षणें.

विष्टब्धे शूलविड्ग्रहौ ॥
विदग्धेऽम्लः सधूमश्चोद्गारो ह्यामे सभुक्तवान् ॥ ५५ ॥

रसशेषेऽन्नविद्वेषः

विष्टब्ध अजीर्णामध्यें पोटांत दुखणें व मलाचा अवरोध हीं लक्षणें असतात. विदग्ध अजीर्णामध्यें आंबट व करपट असे ढेकर येतात, आणि आमाजीर्णामध्यें ज्या प्रकारचें अन्न खावें त्यासारखा ढेकर येतो. रसशेष अजीर्णामध्यें अन्नद्वेष हें लक्षण होतें.

विषूचिकेचें लक्षण.

पूर्वत्रिभ्यो विषूचिका ॥
वम्यतीसारतृट्शूलभ्रमोद्वेष्टनतोदनी ॥ ५६ ॥

पूर्वींच्या विष्टब्धादि तीन अजीर्णांपासून विषूचिका ( कॉलरा ) होते. त्या विषूचिकेमध्यें वांति, अतिसार, तहान, शूल, भ्रम, उद्वेष्टन ( हातपायांस गोळे येणें ) व अंगांत सुया टोंचल्याप्रमाणें टोंचणें हीं लक्षणें होतात.

विषूचिकेचें असाध्य लक्षण.

मूत्राघातास्वप्नकम्पारतिमोहैर्न सिध्यति ॥

विषूचिकेमध्यें ( काल्ऱ्यामध्यें ) मूत्राघात ( लघवी बंद होणें ), निद्रानाश, अंग थरथर कांपणें, चैन न पडणें व मूर्च्छा हीं लक्षणें झालीं असतां ती असाध्य म्हणून समजावें.

भस्मकाचें लक्षण.

वृद्धातिवृद्धक्षीणैस्तैर्भस्मकोऽत्यशनो गदः ॥ ५७ ॥

वातदोष वाढून त्यासह पित्त अत्यंत वृद्धिगत होऊन, कफदोष क्षीण झाल्यामुळें, किती खाल्लें तरी भूक शमत नाहीं अशा प्रकारचा भस्मक नांवाचा रोग होतो.

---

## कृमिनिदान.

ज्वरो विवर्णता शूलो हृद्रोगः श्वसनं भ्रमः ।
अन्नद्वेषोऽतिसारश्च संजातकृमिलक्षणम् ॥ ५८ ॥

ताप, अंगकांति फिक्कट होणें, पोटांत दुखणें, उरांत दुखणें, श्वास, भ्रम, अन्नावर इच्छा नसणें व अतिसार, हीं लक्षणें, पोटांत कृमि झाले असतां होतात.

---

## पांडुरोगनिदान.

अतिव्यवायमद्याम्लदिवास्वप्नमृदादिभिः ।
पाण्डवः पंच तैर्भिन्नैरभिन्नैः पंचमो मृदः ॥ ५९ ॥

अति मैथुन, मद्यपान, अति आंबट पदार्थ खाणें, दिवसा झोंप घेणें व माती खाणें ह्या कारणांनीं पांच प्रकारचे पांडुरोग होतात. वात, पित्त व कफ ह्या तीन दोषांपासून तीन, सर्व दोषांपासून एक व माती खाण्यापासून एक असे पांच प्रकार होत.

### पांडुरोगाचें लक्षण.

पाण्डुत्वङ्नेत्रविण्मूत्रनखैः शोथवमिज्वरैः ।
कासश्वासाग्निमान्द्यैश्च युक्तः स्यात्पाण्डुरोगवान् ॥ ६० ॥

अंगाची त्वचा, डोळे, मळ, मूत्र आणि नखें यांना पांढरेपणा, अंगाला सूज, वांति, ताप, खोकला, श्वास आणि अग्निमांद्य हीं पांडुरोगाचीं लक्षणें आहेत.

### पांडुरोगाचें असाध्य लक्षण.

अन्तशोथी मध्यकृशो मध्यशोथ्यन्तदुर्बलः ।
किंवा ज्वरातिसारी च पाण्डुरोगी न सिध्यति ॥ ६१ ॥

ज्याचे हात, पाय व डोकें यांना सूज असून पोट वगैरे मध्य-भाग कृश झाला आहे, किंवा हात, पाय व डोकें हीं कृश असून पोट वगैरे मध्यभाग सुजला आहे, किंवा ज्याला ज्वरातिसार झाला आहे असा पांडुरोगी साध्य होत नाहीं.

### कामला व कुंभकामला यांचें लक्षण.

पीतत्वङ्मूत्रविण्नेत्रबहुपित्तात्तु कामला ।
सैव वृद्धा कृष्णपीता त्वगादिः कुम्भकामला ॥ ६२ ॥

त्वचा, मूत्र, मळ व डोकें हीं पित्त अत्यंत वाढल्यामुळें पिंवळीं होतात, त्याला कामला ( कावीळ ) असें म्हणतात. ती कावीळ फार वाढली म्हणजे त्वचा, मळ, मूत्र वगैरे कृष्णवर्ण होतात, तेव्हां त्याला कुंभकामला असें म्हणतात.

---

## रक्तपित्तनिदान.

दुष्टं पित्तं विदूष्यास्रं सह तेन बहिर्बिलैः ।

ऊर्ध्वं चाधो द्विधा वेति रक्तपित्तं तदुच्यते ॥ ६३ ॥

दुष्ट झालेलें पित्त रक्ताला दूषित करून त्या रक्तासह नाक, तोंड, गुद वगैरे द्वारांनीं किंवा रोमरंध्रांतून किंवा तोंडावाटे वांतिरूपानें किंवा रेच होऊन बाहेर येतें, त्याला रक्तपित्त असें म्हणतात.

सश्लेष्मोर्ध्वमधः स्वैरं द्विमार्गं सकफानलम् ।
साध्यं याप्यमसाध्यं च रक्तपित्तं क्रमाद्वदेत् ॥ ६४ ॥

कफदोषानें युक्त असलेलें रक्तपित्त ऊर्ध्वमार्गानें ( तोंडावाटे ) बाहेर येतें, केवळ वातदोषानें दूषित असलेलें अधोमार्गानें जातें; व कफ आणि वात यांनीं युक्त असें रक्तपित्त वांति व रेच अशा दोन्ही मार्गांनीं बाहेर येतें. त्यांत ऊर्ध्व मार्गानें येणारें रक्तपित्त साध्य असतें, गुदद्वारानें पडणारें रक्तपित्त कष्टसाध्य असतें, आणि दोन्हीही मार्गांनीं येणारें रक्तपित्त असाध्य असतें.

### रक्तपित्ताचे उपद्रव.

ज्वरापाकवमिश्वासतृट्कासावल्यपांडुताः ।
भुक्ते दाहः शिरस्तापो रेको क्षुच्चास्त्रपित्ततः ॥ ६५ ॥

ताप, अपचन, वांति, श्वास, तहान, खोकला, अशक्तपणा, शरीराला पांढुरकी, खाल्लें असतां अंगाचा दाह होणें, मस्तक तापणें, रेच होणें व शिंका येणें हे विकार रक्तपित्तामध्यें होतात.

---

## क्षयरोगनिदान.

अतिव्यवायव्यायामव्रणशोकज्वराध्वभिः ।
शोषान्कुर्वन्ति तं क्रुद्धा यक्ष्माणं तु कफोल्बणाः ॥ ६६ ॥

अतिमैथुन, अतिश्रम, मोठीशी जखम होणें, अति शोक करणें, सतत अंगांत ज्वर मुरून राहाणें, आणि अतिशय मार्ग चालणें, ह्या कारणांमुळें बाढलेल्या कफदोषानें युक्त असे वातादि दोष शुक्रादि धातूंचें शोषण करून क्षयरोग उत्पन्न करितात.

### क्षयाचीं सामान्य लक्षणें.

करांघ्रिदाहः पार्श्वांसरुक्कफास्रवमिज्वरः ।
वैस्वर्यक्षुद्रकश्वासकासमस्तकगौरवम् ॥ ६७ ॥

**शुक्रेक्षणत्वं मांसेच्छा रिरंसा च क्षयाकृतिः ।**

हातापायांची आग, बरगड्या व खांदे दुखणें, वांतींतून रक्त-मिश्रित कफ पडणें, अंगांत सतत ज्वर असणें, स्वर बदलणें, थोडाथोडा श्वास, खोकला, डोकें जड, डोळ्यांतील बुबुळांचा रंग विशेष पांढरा, आणि मांस खाण्याची व मैथुनाची इच्छा फार, हीं क्षयाचीं लक्षणें आहेत.

उरःक्षताचें लक्षण.

उरःक्षतौ स्याद्रुक्पूतिकफपूयास्रवांतियुक् ॥ ६८ ॥

ज्याला उरःक्षत झालें आहे त्याचे छातींत दुखतें, त्याला वांतींतून पू व रक्त मिश्रित कफ पडतो आणि वांतीला घाण येते.

क्षयाचीं असाध्य लक्षणें.

कासातिसारपार्श्वार्तिस्वरभेदारुचिज्वरैः ॥
षड्भिरेभिः क्षयोऽसाध्यः किंवाऽसृक्कसनज्वरैः ॥ ६९ ॥

खोकला, अतिसार, बरगड्यांत दुखणें, स्वर बदलणें, अरुचि व ज्वर हीं सहा लक्षणें झालीं असतां क्षयरोग असाध्य समजावा. अथवा ओकारींतून किंवा थुंकींतून रक्त पडणें, खोकला व ज्वर हीं बा। लक्षणें असलीं तरी देखील तो क्षयरोग असाध्य समजावा.

---

कासरोगनिदान.

प्राणः सघोषः सोदानो वक्त्रात्प्रैति यदा सतृट् ॥
स कासः पञ्चधा भिन्नैस्तैः क्षतेन क्षयेण च ॥ ७० ॥

प्राणवायु हा उदानवायूसह ( खोक् खोक् असा ) शब्द करीत तोंडांतून बाहेर पडतो, त्यामुळें तोंडाला कोरड पडते. ह्या विकाराला कास ( खोकला ) असें म्हणतात. हा वातादि पृथक् दोषांनीं तीन प्रकारचा ( वातकास, पित्तकास, व कफकास ), छातीमध्यें आंतील बाजूस क्षत झाल्यामुळें एक व क्षयापासून होणारा एक असा पांच प्रकारचा आहे.

वातादिकासांचीं लक्षणें.

कासते शुष्कमनिलात्पित्तात्पीतं वमेत्कटु ॥
कफात्स्वादु कफं चान्त्यावसाध्यावुक्तलक्षणौ ॥ ७१ ॥

वातजन्य कासामध्यें खोकला कोरडा असतो. पित्तजन्य कासामध्यें पिवळट रंगाची व तिखट अशी पित्तयुक्त वांति होते. कफजन्य कासामध्यें तोंडाला गुळमटपणा असतो, आणि कफ पडतो तोही गुळमट असतो. क्षतजन्य व क्षयजन्य कास ह्यांचीं लक्षणें वर क्षयरोगाच्या असाध्य लक्षणांत आलेलींच आहेत, म्हणून ते दोन्ही ही कास असाध्य होत.

---

## हिक्का ( उचकी ) निदान.

पूर्ववत्कुरुते प्राणो हिक्काः पंच गतिक्रमात् ॥

पूर्ववत् ( म्हणजे कासनिदानांत सांगितल्याप्रमाणें ) प्राणवायु हा उदानवायूसह प्रकुपित होऊन ( हिक्, हिक् असा ) शब्द करीत तोंडावाटे बाहेर पडतो. ह्या प्रकाराला हिक्का ( उचकी ) असें म्हणतात. प्रकुपित झालेल्या वायूच्या गतीवरून ह्या उचकीचे पांच प्रकार होतात.

### उचकींचीं नांवें व लक्षणें.

अन्नजाऽऽहारबाहुल्याद्यमिका द्वित्रिवेगिनी ॥ ७२ ॥
हिक्का क्षुद्रा जत्रुमन्दा गम्भीरा नाभिकम्पकृत् ॥
कम्पयत्यंगमखिलं महत्यन्ते न सिध्यति ॥ ७३ ॥

त्यांत अन्नजा नांवाची जी उचकी आहे, ती वाजवीपेक्षां अधिक आहार केल्यामुळें उत्पन्न होते. जी उचकी राहून राहून एकदम दोन किंवा तीन वेळ येते, तिला यमिका किंवा यमला असें म्हणतात. जी कंठामधून मंद वेगानें येते, तिला क्षुद्रा असें म्हणतात. जी नाभीपासून निघते व गंभीर नादानें बाहेर पडते तिला गंभीरा असें म्हणतात. तिच्या योगानें नाभिच्या ठिकाणीं कंप उत्पन्न होतो. आणि महती नांवाची जी उचकी आहे तिच्या योगानें सर्व अंग कांपतें. ही शेवटची उचकी असाध्य आहे.

---

## श्वासनिदान.

अधश्चोर्ध्वं कफो वातो यात्यायाति मुहुर्यदा ॥
कफरुद्धगतिर्विष्वक् तदा श्वासान्करोत्यसौ ॥ ७४ ॥

जेव्हां कफदोष आपल्या स्थानापासून वरचेवर खालीं जातो व वातदोष आपल्या स्थानापासून वरचेवर वर येतो, त्या वेळीं कफानें वाताची गति बंद झाल्यामुळें, तो वात प्रकुपित होऊन श्वासरोग उत्पन्न करितो.

महोर्ध्वच्छिन्नतमकक्षुद्राख्यान्स्वगतिक्रमात् ॥

ह्याच्या गतीवरून महाश्वास, ऊर्ध्वश्वास, छिन्नश्वास, तमक-श्वास व क्षुद्रश्वास असे त्याचे पांच प्रकार आहेत.

महता निःश्वसित्युच्चैरुर्ध्वेनोर्ध्वमधो नतु ॥ ७५ ॥
विच्छिन्नवेगं छिन्नेन तमकेनातिमूर्धरुक् ॥
क्षुद्रेण श्वसनेनाल्पं पूर्वे साध्या न ते त्रयः ॥ ७६ ॥

महाश्वासामुळें रोगी दीर्घश्वास टाकतो. ऊर्ध्वश्वासामुळें रोग्याला फक्त वर धाप लागते, त्याचा श्वास खालीं जात नाहीं. छिन्नश्वासानें रोगी थांबतथांबत तुटक तुटक असा श्वास टाकतो. तमकश्वासानें रोग्याला अतिशय पीडा होते व त्याचें डोकें दुखतें. आणि क्षुद्र-श्वासाचा जोर थोडा असतो. ह्यापैकीं महाश्वास, ऊर्ध्वश्वास व छिन्नश्वास हे तीन साध्य होत नाहींत.

---

## स्वरभेदनिदान.

अत्युच्चभाषाघाताद्यैः क्रुद्धैर्दोषैः स्वरामयः ॥
षोढा पृथक् समस्तैः स्यान्मेदसा च क्षयेण च ॥ ७७ ॥
स्वनिदानस्वरूपास्ते नतु साध्यास्त्रयोऽन्तिमाः ॥

फार मोठ्यानें बोलणें किंवा कशाचा तरी छातीवर, कंठावर वगैरे आघात होणें अशा कारणांनीं प्रकुपित झालेले वातादि दोष स्वरभेदरोग उत्पन्न करितात. हा वातजन्य, पित्तजन्य, कफजन्य, त्रिदोषजन्य, मेदोजन्य व क्षयजन्य असा सहा प्रकारचा स्वरभेद

* (१) वातजन्य स्वरभेदामध्यें आवाज कर्कश असतो. (२) पित्तजन्य स्वरभेदामध्यें घशाची आग होते. (३) कफजन्य स्वरभेदानें घसा दाटतो व रोगी हळुहळू, अडखळत व थोडें बोलतो. (४) त्रिदोषजन्य स्वरभेदांत तिन्ही दोषांचीं लक्षणें असतात. (५) क्षयजन्य स्वरभेदानें आवाज क्षीण होतो. (६) मेदोजन्य स्वरभेदामुळें रोग्याचा आवाज बाहेर पडत नाहीं; तो आंतल्या आंत बोलतो.

आहे. हे त्या त्या दोषाच्या लक्षणांनीं युक्त असतात. शेवटचे तीन म्हणजे त्रिदोषजन्य, मेदोजन्य व क्षयजन्य हे असाध्य आहेत.

---

## अरोचकनिदान.

स्वाद्ध्यन्नं मुखे चेन्न स्वदतेऽसावरोचकः ॥ ७८ ॥
स पंचधा पृथक् सर्वैस्तैः परो रुग्भयादिभिः ॥
अरोचके मुखं तत्तद्रसं प्राकृतमन्तिमे ॥ ७९ ॥

उत्तम रुचिकारक असें अन्न तोंडांत घातलें असतां तें रुचिकर लागत नाहीं, त्याला अरोचक रोग म्हणतात. हा अरोचक व्याधि वातादि तीन दोषांनीं तीन प्रकारचा, एक त्रिदोषजन्य आणि एक आगंतुक-म्हणजे भय, शोक, अतिलोभ, क्रोध व मनाची उद्विग्नता वगैरे कारणांनीं होणारा असा पांच प्रकारचा आहे. वातादि दोषांनीं त्या त्या दोषानुरूप तोंडाची रुचि असते आणि आगंतुक अरोचकामध्यें ती अनेक प्रकारची [१]असते.

---

## छर्दिनिदान.

अत्यजीर्णपटुस्निग्धाहृद्यगर्भकृमिद्रुतैः ।
दोषैः पृथक् समस्तैश्च हृद्यैः पंचविधा वमिः ॥ ८० ॥

अतिशय अजीर्ण झाल्यामुळें, खारट पदार्थांच्या अति सेवनानें, स्निग्ध पदार्थ किंवा न आवडणारे पदार्थ फार खाण्यानें, गर्भार स्त्रियांना गरोदरपणामुळें, पोटांत कृमि झाल्यामुळें आणि अति घाईनें जेवण केल्यामुळें छर्दि म्हणजे वांति किंवा ओकारी उत्पन्न होते. ती वातादि तीन दोषांनीं तीन प्रकारची, त्रिदोषापासून एक, आणि आगंतुक एक, अशी पांच प्रकारची आहे.

---

१ वातजन्य अरुचीमुळे तोंड तुरट अमून छातींत दुखतें; पित्तजन्य अरुचीमुळें तिखट, आंबट व घाणेरडें तोंड होतें, तहान लागते व दाह होतो. कफजन्य अरुचीमध्यें तोंड गुळमट, चिकट व मळमळीत असतें. त्रिदोषजन्य अरुचीमध्यें तिन्हींही दोषांचीं लक्षणें असतात, आणि आगंतुक अरुचीमध्यें तोंडाला एकच प्रकारची चव नसून त्यांत अनेक विकार असतात व त्यामुळें ग्लानि वगैरे विकार होतात.

### वांतीचें लक्षण.

श्यामं वातेन पित्तेन पीतं श्वेतं कफेन च ।
सर्वैश्चित्रं वमेद्गर्भाद्बीभत्सादीक्षणादपि ॥ ८१ ॥

वातदोषानें होणारी वांति नीलवर्ण असते. पित्तदोषानें होणारी वांति पीतवर्ण असते. कफदोषानें होणारी वांति श्वेतवर्ण असते. त्रिदोषजन्य वांतीचा चित्रविचित्र रंग असतो. आणि गर्भारपणामुळें किंवा कृमिरोगामुळें जी आगंतुक वांति उत्पन्न होते, तिजमध्यें त्या त्या दोषानुरूप लक्षणें असतात.

### वांतीचे उपद्रव.

कासः श्वासो ज्वरो हिक्का तृष्णा वैचित्त्यमेव च ॥
हृद्रोगस्तमकश्चैव ज्ञेयाश्छर्देरुपद्रवाः ॥ ८२ ॥

खोकला, श्वास, ज्वर, उचकी, तृष्णा, मनाला उदासीनता, हृद्रोग आणि तमक-श्वास हे वांतीचे उपद्रव आहेत.

---

## तृष्णानिदान.

सततं यः पिबेद्वारि न तृप्तिमुपगच्छति ।
पुनः काङ्क्षति तोयं यस्तं तृष्णार्दितमादिशेत् ॥ ८३ ॥

एकसारखें वरचेवर पाणी पीत असतांही ज्यास समाधान वाटत नाहीं व जो आणखी पाणी पिण्याची इच्छा करितो, त्याला तहानेचा आजार झाला आहे असें समजावें.

### तृषेची संप्राप्ति व प्रकार.

पित्तं तालुगतं क्रुद्धं सवातं कुरुते तृषाम् ।
सा सप्तधा पृथक् तैश्च क्षतामक्षयभोजनैः ॥ ८४ ॥

टाळ्याच्या आश्रयानें असलेलें पित्त प्रकुपित होऊन वाताच्या साहाय्यानें जीभ वगैरे शुष्क करून तहान उत्पन्न करितें. ती वातादि तीन दोषांनीं तीन प्रकारची, त्रिदोषजन्य एक, क्षतजन्य ( जखम वगैरे झाल्यामुळें होणारी ) एक, आमदोषापासून होणारी, क्षयरोगापासून होणारी व भोजनामुळें होणारी अशी एकंदर सात प्रकारची आहे.

### तृषेचीं लक्षणें.

शीताद्धिवर्धते वाताच्च पित्ताज्जाड्यकृत्कफात् ।
तृड् त्रिलिङ्गाऽऽमजा घातास्रक्षयाभ्यां क्षतोद्भवा ॥ ८५ ॥
रसक्षयात्सहृत्पीडा पट्वाद्याधिक्यतोऽन्यजा ।

थंड पाणी पिण्यानें किंवा शीत उपचारांनीं जी तहान अधिक होते, ती वातजन्य तृष्णा होय. जी शीत उपचारानें अधिक होत नाहीं, कमी होते, ती पित्तजन्य तृष्णा होय. (ही उष्ण उपचारांनीं वाढते.) कफजन्य तहानेमध्यें अंगाला जडत्व असतें. आमदोषजन्य तृषेमध्यें तिन्ही दोषांचीं लक्षणें असतात. जखमेंतून अतिशय रक्त गेल्यामुळें उत्पन्न होणाऱ्या तहानेला क्षतजन्य तृषा म्हणतात. रसधातूचा क्षय झाल्यामुळें जी तहान लागते तिला क्षयजन्य तृषा म्हणतात. तिजमध्यें छातींत दुखतें. आणि जेवणामध्यें मीठ फार खाण्यांत आल्यामुळें अन्नजा तृषा उत्पन्न होते.

मोहज्वरश्वासकासकर्त्री तृष्णा न सिध्यति ॥ ८६ ॥

मूर्च्छा, ज्वर, श्वास व खोकला, हे उपद्रव ज्या तहानेमध्यें आहेत ती साध्य होत नाहीं.

---

## मूर्च्छानिदान.

### मूर्च्छेची संप्राप्ति.

संज्ञास्रोतांसि ते रुद्ध्वा विशंति करणानि चेत् ।
क्रुद्धपित्तास्तदा मर्त्या मूर्च्छन्ति गतचेतनाः ॥ ८७ ॥

प्रकुपित झालेले वातादि दोष ज्ञानतंतूंचा रोध करून जर कान, डोळे वगैरे ज्ञानेंद्रियांत शिरले, तर त्यामुळें त्या मनुष्याचें पित्त वाढून तो चेतनारहित होऊन मूर्छित पडतो. म्हणून ह्या विकाराला मूर्च्छा असें म्हणतात.

### मूर्च्छेचीं लक्षणें व प्रकार.

**सप्त मूर्च्छाः पृथक् सर्वैस्तैश्च मद्यविषास्रतः ।**

**वातादि तीन दोषांनीं तीन, त्रिदोषजन्य एक, मद्यापासून एक, विषजन्य एक आणि रक्तजन्य एक असे मूर्च्छेचे ७ प्रकार आहेत.**

**दोषवर्णं वियत्पश्यन् दोषैर्मूर्च्छति चासवात् ॥ ८८ ॥**

असौम्यः सप्रलापोऽथ दाहहृत्कंपवान्विषात् ।
पित्तवद्रक्तगन्धेन संन्यासोऽस्तेन्द्रियक्रियः ॥ ८९ ॥

ह्यापैकीं ज्या मूर्च्छेमध्यें जो दोष अधिक असेल त्या दोषा-नुरूप आकाशाचा वर्ण पहात असतां मनुष्य मूर्च्छित होतो[1]. मद्य-जन्य मूर्च्छेमध्यें रोगी दीनवाणा होऊन बडबड करितो. विषजन्य मूर्च्छेमध्यें दाह आणि हृदयकंप हे विकार होतात. रक्ताच्या घाणीनें जी मूर्च्छा येते, तिजमध्यें पित्तजन्य मूर्च्छेसारखीं लक्षणें असतात. आणि संन्यास म्हणून जो मूर्च्छेचा प्रकार आहे त्यांत सर्व इंद्रियें निश्चेष्ट होऊन रोगी काष्ठवत् मूर्च्छित पडतो.

---

## मदात्ययनिदान.

मद्यं पीतमयुक्त्या तैः कुर्यात्पानात्ययांश्चतुः ।

अयोग्य रीतीनें मद्यसेवन केलें असतां त्यापासून मदात्ययरोग उत्पन्न होतो. तो वातादि तीन दोषांनीं तीन प्रकारचा व त्रिदोष-जन्य एक, मिळून चार प्रकारचा आहे.

### मदात्ययाचें लक्षण.

वमिर्मूर्च्छा ज्वरो दाहः प्रलापश्च भ्रमोऽरुचिः ॥९०॥
रेकास्वप्नारतिकफाः पानाजीर्णस्य लक्षणम् ।

ओकारी, मूर्च्छा, ज्वर, दाह, बडबड, भ्रम, अरुचि, जुलाब होणें, झोंप न येणें, मनाला अस्वस्थपणा व कफ वाढणें हीं लक्षणें मदात्ययाच्या विकारामध्यें होतात. याला पानात्यय असेंही म्हणतात.

---

## दाहरोगनिदान.

पानोष्मा त्वग्गतो दाहं सपित्तास्रः करोत्यति ॥ ९१ ॥

मद्यपानामुळें शरीरांत उत्पन्न होणारी उष्णता रक्त व पित्त

१. ( १ ) वातजन्य मूर्च्छेंत आकाश निळें, काळें किंवा तांबडें दिसतें. ( २ ) पित्तजन्य मूर्च्छेंत आकाश तांबडें व हिरवट दिसतें. ( ३ ) कफ-जन्य मूर्च्छेमध्यें आकाश मेघाप्रमाणें कृष्णवर्ण व काळोखानें व्याप्त दिसतें. ( ४ ) त्रिदोषजन्य मूर्च्छेमध्यें आकाश तिन्ही दोषांच्या रंगांनीं मिश्र दिसतें.

यांसह त्वचेचा आश्रय करून अत्यंत दाह उत्पन्न करिते.*

---

## उन्मादनिदान.

भीशोककामदुष्टान्नैः पूज्यादेश्चावघर्षणैः ।
मदयन्ति मनोदोषाः स्यादुन्मादस्ततोद्धताः ॥ ९२ ॥

भय, शोक, कामवासना, दूषित अन्नाचें सेवन, आणि देव, गुरु, वडील माणसें वगैरे पूज्य लोकांचा अपमान करणें, यामुळें मनाचे रजस्तमादि दोष, वातादि दोषांसह प्रकुपित होऊन मनोवह स्रोतसांत शिरून मनाला उन्मत्त करून उन्मादरोग उत्पन्न करितात.

### उन्मादाचें लक्षण.

अस्थाने हास्यगीताद्यैः ह्रीधीस्वप्नविपर्ययैः ।
रहस्यकथनोद्विग्नभ्रमैरुन्मादमादिशेत् ॥ ९३ ॥

विनाकारण हसणें, विनाकारण गाणें, निर्लज्जपणानें वागणें, बुद्धीचा विपर्यास, झोप न येणें, मनांतील गुप्त गोष्ट सांगणें, मन उद्विग्न असणें व घेरी येणें हीं लक्षणें असलीं म्हणजे उन्मादरोग आहे असें समजावें.

### उन्मादाचे प्रकार व त्यांचीं लक्षणें.

दोषैर्व्यस्तैः समस्तैश्च विषशुग्भ्यां स षड्विधः ।
दोषांकाः पूर्ववच्छोकभीकामाद्यैस्तु तत्कथाः ॥ ९४ ॥

वातादि तीन दोषांपासून तीन प्रकारचा, त्रिदोषजन्य एक, विषजन्य एक, आणि शोकादि कारणजन्य एक, मिळून उन्माद-रोग सहा प्रकारचा आहे. वातादि चार प्रकारच्या उन्मादांमध्यें त्या त्या दोषानुरूप लक्षणें असतात. आणि शोकजन्य, भयजन्य व कामजन्य उन्मादामध्यें रोगी त्या त्या विषयानुसार गोष्टी सांगतो.

### भूतोन्मादलक्षण.

देवदैत्यपिशाचाहिरक्षोगन्धर्वयक्षतः ।
पितृतश्च ग्रहेभ्यः स्युरुन्मादाः प्रोक्तलक्षणाः ॥ ९५ ॥

---

* हा दाहरोग सात प्रकारचा आहे–१ मद्यजन्य, २ रक्तजन्य, ३ पित्त-जन्य, ४ तृष्णानिरोधजन्य, ५ धातुक्षयजन्य, ६ क्षतजन्य ( जखमेमुळें होणारा) आणि ७ अभिघातजन्य.

देवग्रहजुष्ट (देवग्रहाची बाधा झालेला), दैत्यग्रहजुष्ट, पिशाच्च-ग्रहजुष्ट, सर्पग्रहजुष्ट, राक्षसग्रहजुष्ट, गंधर्वग्रहजुष्ट, यक्षग्रहजुष्ट व पितृग्रहजुष्ट असे आठ प्रकारचे भूतोन्माद आहेत. ह्यांतही वर सांगितलेल्या उन्मादांसारखींच लक्षणें असतात.

भूतोन्मादाचें विशेष लक्षण.

पावित्र्यं देवविद्वेषो नग्नत्वं सर्पवद्गतिः ।
बहुभुक्त्वं गानदाने श्राद्धं चेति तदाकृतिः ॥ ९६ ॥

देवग्रहानें पीडित मनुष्य पवित्र आचरण करितो. दैत्यग्रहानें पीडित मनुष्य देवतांचा द्वेष करितो. पिशाच्चग्रहानें पीडित मनुष्य नग्न स्थितींत राहतो. सर्पग्रहानें पीडित मनुष्य साप प्रमाणें सर्पटत चालतो. राक्षसग्रहानें पीडित मनुष्य अन्न फार खातो. गंधर्वग्रहानें पीडित मनुष्य गायन करतो. यक्षग्रहानें पीडित मनुष्य उदारपणें दान देतो आणि पितृग्रहानें पीडित मनुष्य श्राद्ध करित राहतो.

उन्मदाचें असाध्य लक्षण.

कम्पनिद्राफेनवमिद्रुमादिपतनादिभिः ।
त्रयोदशेऽब्देऽतीते तु नोन्मादी जातु जीवति ॥ ९७ ॥

जो उन्मादरोगी थरथर कांपतो, ज्याला झोंप येते, जो फेस ओकतो, किंवा झाडावरून पडल्यामुळें ज्याला उन्माद झाला आहे, किंवा व ज्याच्या उन्मादाला तेरा वर्षें होऊन गेलीं आहेत असा उन्मादाचा रोगी साध्य होत नाहीं.

---

## अपस्मारनिदान.

अपस्माराची संप्राप्ति.

दोषोद्रेकात्प्रजातायां स्मृतौ सत्यामपस्मृतिः ।

वातादि दोषांचा प्रकोप होऊन त्यांनीं संज्ञावह स्रोतसें व्यापिलीं असतां मनुष्याची स्मरणशक्ति नष्ट होऊन अपस्मार रोग उत्पन्न होतो.

अपस्माराचें लक्षण.

तदाकृतिस्तमः फेनकम्पनेत्रादिवैकृतम् ॥ ९८ ॥

ज्याला अपस्माराचा झटका ( फीट ) येतो, त्याला एकदम सर्वत्र

अंधार दिसतो, त्याचे तोंडाला फेस येतो, अंग थरथर कांपतें आणि डोळे व हातपाय वगैरे अवयव वेडेवाकडे करून तो बेशुद्ध पडतो.

अपस्माराचे प्रकार व त्याचे झटक्याची वेळ.

चतुर्धाऽसौ पृथक् सर्वैस्तैस्तत्कोपः क्रमादिह ।
रविपंचदशत्रिंशद्दिनेषु सकलेष्वपि ॥ ९९ ॥

हा अपस्मारव्याधि वातादि तीन दोषांनीं तीन प्रकारचा व त्रिदोषजन्य एक मिळून चार प्रकारचा आहे. त्यांपैकीं वातदोषजन्य अपस्माराचा झटका बारा दिवसांनीं येतो. पित्तजन्य अपस्माराचा पंधरा दिवसांनीं येतो. कफजन्य अपस्माराचा तीस दिवसांनीं येतो आणि त्रिदोजषन्य अपस्माराचा झटका प्रतिदिवशीं देखील येतो.

---

## वातव्याधिनिदान.

अशीतिर्वातजा रोगा भवन्त्याक्षेपकादयः ।
अतिप्रसिद्धान्कियतस्तेष्वहं तानिह ब्रुवे ॥ १०० ॥

आक्षेपक आदिकरून वातरोग ऐशीं आहेत. त्यांपैकीं जे अतिशय प्रसिद्ध आहेत त्यांतील कित्येक मी येथें सांगतों.

### आक्षेपक.

आक्षेपको गतिक्षेपात्

ज्या वातरोगांत रोगी चालण्याला असमर्थ होतो, त्याला आक्षेपक नांवाचा वातरोग म्हणतात.

### खल्ली.

खल्ली जंघोरुपादरुक् ।

ज्याच्या पिंढऱ्या, मांड्या व पावलें ह्यांमध्यें ठणका लागतो, त्याच्या त्या वातरोगाला 'खल्ली' असें म्हणतात.

### अष्ठीला.

सरुङ्नाभेरधो ग्रन्थिरष्ठीला रुद्धमूत्रविट् ॥ १०१ ॥

बेंबीच्या खालील पोटांत एक लांबट गांठ उत्पन्न होते, ती फार ठणकते व तिजमुळें मल व मूत्र ह्यांचा अवरोध होतो. ह्या गांठीला 'अष्ठीला' असें म्हणतात.

प्रत्यष्ठीला.

प्रत्यष्ठीलोदरे चेत्सा सपीडा तिर्यगुत्थिता ।

प्रत्यष्ठीलेची गाठ पोटामध्यें आडवी उत्पन्न होते व तिच्यामुळेंही वरील अष्ठीलेप्रमाणेंच मलमूत्रांचा अवरोध होतो.

आध्मान.

आध्मानं स्याद्यदाध्मानं साटोपमुदरं सरुक् ॥ १०२ ॥

ज्या विकारानें पोट फुगतें, दुखतें व पोटांत गुडगुडतें, त्या विकाराला 'आध्मान' असें म्हणतात.

प्रत्याध्मान.

कफव्याकुलिते वाते प्रत्याध्मानं प्रजायते ।

वायु कफानें आवृत होऊन वरील आध्मानवाताप्रमाणेंच पीडा करितो, त्याला 'प्रत्याध्मान' असें म्हणतात.

तूणी.

विण्मूत्राशयजा पीडाऽधोगता तूणिकोच्यते ॥ १०३ ॥

मलाशय व मूत्राशय ह्यांमध्यें उत्पन्न होणारी कळ खालीं मांड्यांकडे शिरते, ह्या वातविकाराला तूणीवात असें म्हणतात.

प्रतूणी

गुदोपस्थोत्थिता रुक् चेद्यात्यूर्ध्वं प्रतितूणिका ।

मलमार्ग व मूत्रमार्ग ह्यांमधून उत्पन्न होणारी कळ वर पोटामध्यें शिरते, ह्या वातविकाराला प्रतितूणी अथवा प्रतूणी असें म्हणतात.

अर्दितवात.

वक्रीकरोति वक्त्रार्धं वातश्चेत्सरुगर्दितम् ॥ १०४ ॥

कुपित झालेला वायु अर्धें तोंड वाकडें करितो, ह्या विकाराला 'अर्दितवात' असें म्हणतात.

गृध्रसी.

गृध्रसी स्फिक्पायुकटिजानुजंघापदव्यथा ।

ढुंगण, मलमार्ग, कंबर, गुडघे, पिंढऱ्या व पाय ह्या ठिकाणीं ठणका असतो व जखडल्यासारखें होतें, त्याला 'गृध्रसी' म्हणतात.

क्रोष्टुशीर्ष.

क्रोष्टुशीर्षं जानुशोथः

वायूनें गुडघा अतिशय सुजून त्यास ठणका लागतो, ह्या वात-विकाराला 'क्रोष्टुशीर्ष' ( गुडघी ) असें म्हणतात.

विश्वाची.

विश्वाची भुजयोर्व्यथा ॥ १०५ ॥

दोन्ही बाहूंचे ठिकाणीं वातप्रकोपानें ठणका लागतो, ह्या विका-राला 'विश्वाची' असें म्हणतात.

खंजत्व व पंगुत्व ( लंगडेपणा व पांगळेपणा. )

खांजस्यैकनिग्रहात्सक्थ्नः पंगुत्वमुभयोस्तयोः ।

एकच मांडी जखडली असतां त्या वातविकाराला खंजवात असें म्हणतात. आणि दोन्ही मांड्या जखडून त्यांची हालचाल करणें अशक्य झालें असतां त्या वातविकाराला पंगुत्व असें म्हणतात.

ऊर्ध्ववात व मूकत्व.

अत्युद्गारस्तूर्ध्ववातो नष्टवाक्त्वं तु मूकता ॥ १०६ ॥

ज्या वातविकारानें अतिशय ढेकरा येतात, त्या वातविकाराला ऊर्ध्ववात असें म्हणतात. आणि ज्या वातविकारामुळें मनुष्याला बोलतां येत नाहीं त्याला मूकत्व असें म्हणतात.

कालायखंजवात.

कलायखञ्जः स भवेत्प्रकामं वेपते तु यः ।

चालतांना ज्यामुळें मनुष्य अतिशय लटलट कांपतो त्या रोगाला कलायखंजवात असें म्हणतात.

अवबाहुक.

आमूलमेकं बाहोश्चेद्व्यथा स्यादपबाहुकः ॥ १०७ ॥

एकच बाहु जर मूळापासून दुखत असेल तर त्या वातविका-राला 'अवबाहुक' असें म्हणतात.

हनुग्रह.

विवृतं संवृतं वाऽऽस्यं यः कुर्यात्स हनुग्रहः ।

ज्या वातविकारामुळें तोंड उघडून राहतें किंवा दांतखिळी बसून राहते, त्या विकाराला हनुग्रह असें म्हणतात.

सर्वांगवात किंवा एकांगवात

सर्वाङ्गैकाङ्गरोगौ स्तः सर्वाङ्गैकाङ्गनिग्रहात् ॥ १०८ ॥

सर्व अंग जखडून चलनवलनास असमर्थ झालें असतां त्या विकाराला सर्वांगवात असें म्हणतात. आणि एकच अंग चलनवलनास असमर्थ झालें असतां त्या विकाराला एकांगवात असें म्हणतात. कोणी ह्या विकाराला पक्षाघात किंवा अर्धांगवायु असेंही म्हणतात.

अपतंत्रक ( धनुर्वात )

मुहुर्धनुर्वन्नमयेन्मोहयेच्चापतंत्रकः ।

जो वात शरीरास धनुष्याप्रमाणें वांकवून ताठवितो व बेशुद्ध करतो, त्याला अपतंत्रक असें म्हणतात.

जिव्हास्तंभ.

जिह्वास्तंभः स येनान्नपानवाक्येष्वनीशता ॥ १०९ ॥

ज्या वाताच्या योगानें जीभ ताठून, बोलण्याला व अन्नपाणी घेण्याला असमर्थ होते, ह्या विकाराला जिव्हास्तंभ असें म्हणतात.

बहिरायाम व अंतरायाम.

बाह्यायामांतरायामौ बहिरन्तश्च कर्षणात् ।
स्नायुनामथ विज्ञेयो व्रणायामो रुषा तथा ॥ ११० ॥

स्नायूचा छेद झाल्यामुळें बहिरायाम ( पाठीकडून अंग वाकणें ) व अंतरायाम ( छातीकडून अंग वाकणें ) हे विकार होतात. हे दोनही अपतंत्रकाचेच प्रकार आहेत. मर्मस्थानीं जखम झाल्यामुळेंही अंतरायाम किंवा बहिरायाम विकार होतो. त्याला व्रणायाम असें म्हणतात.

अनुक्त वातरोग.

स्थानानामनुरूपांश्च लिंगैः शेषान्विनिर्दिशेत् ।

त्या त्या स्थानाला अनुसरून व त्या त्या लक्षणांवरून बाकीच्या वातरोगांची परीक्षा करावी.

वातरोगाचें असाध्य लक्षण.

घ्नन्ति वातामया वृद्धाः क्षीणमांसबलानलम् ॥ १११ ॥

अतिशय वाढलेले वातरोग, ज्याचें बळ व मांस क्षीण झालें आहे व अग्नि मंद झाला आहे, त्याचा नाश करितात.

---

## वातरक्तनिदान.

अत्यध्ववाहनविदाह्यन्नादेः सरुषाऽसृजा ।
युज्यते चेन्मरुद् दुष्टस्तदा स्याद्वातशोणितम् ॥ ११२ ॥

अतिशय मार्ग चालणें, हत्ती घोडे वगैरे वाहनांवरून अतिशय प्रवास करणें किंवा विदाहि अन्न खाणें, ह्या कारणानें क्षुब्ध झालेलें रक्त वायूच्या सह दूषित झालें असतां वातरक्त उत्पन्न होतें.

### वातरक्ताचें लक्षण.

दाहगौरवरुक्तोदकंडूवैवर्ण्यमण्डलम् ।
सस्युदर्शांगसंकोचशोथं वातास्रलक्षणम् ॥ ११३ ॥

अंगाचा दाह होणें, अंग जड होणें, अंग ठणकणें, अंगात टोचल्यासारखी पीडा होणें, अंगास खाज उठणें, अंगाचा वर्ण बदलणें, अंगावर डाग उठणें, त्वचेवर मोठ्या मोठ्या गांदी उठणें, अवयव आखडणें व सूज येणें हीं वातरक्ताचीं लक्षणें आहेत.

### दोषानुरूप वातरक्ताचें विशेष लक्षण.

वाताधिकेऽतिरुक्पित्ते दाहो रक्तेऽतिशोणता ।
कफेऽतिगौरवं चिह्नं द्वित्रिजे द्वित्रिलक्षणम् ॥ ११४ ॥

वाताधिक वातरक्तामध्यें अतिशय ठणका असतो. पित्ताधिक वातरक्तामध्यें दाह फार असतो व रक्तदोषामुळें अंगाला अतिशय लाली असते. कफदोषामुळें अतिशय जडत्व येतें. आणि द्विदोषजन्य व त्रिदोषजन्य वातरक्तामध्यें त्या त्या दोन किंवा तीन दोषांचीं लक्षणें असतात.

### वातरक्ताचे उपद्रव.

मोहदाहज्वरास्वप्नपांगुल्यांगुलिवैकृतम् ।
मर्मग्रहभ्रमास्फोटा वातास्रोपद्रवा नव ॥ ११५ ॥

मूर्च्छा, दाह, ज्वर, झोप न येणें, पांगळेपणा, हाताचीं व पायाचीं बोटें वाकडीं होणें, मर्मस्थानीं पीडा, घेरी आणि अंगावर फोड येणें हे वातरक्ताचे नऊ उपद्रव आहेत.

---

## आमवातनिदान.

युगपत्कुपितावामवातौ स्वीयप्रकोपनैः ।
आमवातं जनयतः सशोथं सन्धिरुग्ग्रहम् ॥ ११६ ॥

स्वकारणानें एकाच वेळीं प्रकुपित झालेले आम व वात दोष आमवात नांवाचा विकार उत्पन्न करितात. त्यामुळें सूज येते, सांधे आखडतात व सांध्याच्या ठिकाणीं ठणका असतो.

### आमवाताचें लक्षण.

सर्वांगैकांगसन्धिस्थशोथार्तिग्रहगौरवम् ।
ज्वरापाकाग्निमांद्ये च तृष्णा चामानिलाकृतिः ॥ ११७

सर्व अंगाचे किंवा अंगाच्या एकाद्या भागाचे सांध्याचे ठिकाणीं सूज येते, तेथें ठणका असतो, सांधे आखडतात व त्यांना जडत्व येतें, त्यामुळें ज्वर येतो, ती सूज पिकत नाहीं, भूक लागत नाही व तहान फार लागते. हीं आमवाताचीं लक्षणें आहेत.

### वातादि दोषानुसार आमवाताचें लक्षण.

आमवाताधिके वातेऽतिरुग्दाहस्तु पित्ततः ।
कफात्स्तैमित्यगुरुते सर्वलक्ष्मं त्रिदोषतः ॥ ११८ ॥

वाताधिक आमवातामध्यें ठणका फार असतो. पित्त अधिक असलें तर दाह होतो; कफाधिक आमवातामध्यें अंगाला ओलें वस्त्र गुंडाळल्यासारखें वाटतें व जडत्व येतें. आणि त्रिदोषजन्य आमवातांत तिन्हीही दोषांचीं लक्षणें असतात.

### आमवाताचे उपद्रव.

जाड्यान्त्रकूजनानाहतृट्छर्दिबहुमूत्रताः ।
शूलं शयननाशोऽष्टोपद्रवा ह्यामवातजाः ॥ ११९ ॥

जडत्व, आंतड्यांत गुडगुडणें, पोट फुगणें, तहान, ओकारी, लघवी फार, ठणका व झोप न येणें हे आमवाताचे ८ उपद्रव आहेत.

---

## शूलनिदान.

एकदेशेऽतिरुक् शूलं शिम्बीधान्यादिसेवनात् ।
क्रुद्धैः पृथक् द्वंद्वसर्वैर्दोषैश्चामात्तदष्टधा ॥ १२० ॥

शेंगांतील धान्यें ( तुरी, मूग वगैरे ) ह्यांचें अतिसेवन केल्यामुळें पोटांतील एकाद्या भागांत अतिशय कळ उठते, तिला शूल असें ह्मणतात. हा शूल प्रकुपित झालेल्या वातादि तीन दोषांपासून तीन प्रकारचा, दोन दोन दोषांपासून तीन प्रकारचा, त्रिदोषजन्य

एक आणि आमदोषापासून झालेला एक मिळून आठ प्रकारचा आहे.

दोषपरत्वें शूलाचीं स्थानें.

पित्ते नाभ्यां चलाद्बस्तौ पार्श्वहृत्कुक्षिजं कफात्।
द्वित्रिस्थानं द्वित्रिदोषं शूलं चामाशये रसात् ॥ १२१ ॥

हा शूळ पित्तदोषामुळें नाभीच्या ठिकाणीं होतो. वातदोषामुळें वस्तीमध्यें (ओटीपोटांत) होतो. आणि कफदोषामुळें बरगडया, छाती आणि कुशी ह्यांच्यामध्यें होतो. द्वंद्वज शूळ त्या त्या दोन दोषांच्या स्थानीं होतो. त्रिदोषजन्य शूळ तिन्हीही दोषांच्या स्थानीं होतो आणि आमशूळ रसस्थानीं म्हणजे आमाशयांतच होतो.

शूळाचे उपद्रव.

वेदनानाहमूर्च्छाख्यास्तृड्कृच्छ्रे गौरवारुची।
कासः श्वासश्च हिक्का च शूलस्योपद्रवा दश ॥ १२२ ॥

कळ येणें, पोट फुगणें, मूर्च्छा, तहान, मूत्रकृच्छ्र, अंगाला जडत्व, अरुचि, खोकला, श्वास व उचकी हे दहा शूळाचे उपद्रव होत.

---

## परिणामशूळनिदान.

बलासः प्रच्युतः स्थानात्पित्तेन सह मूर्छितः।
वायुमादाय कुरुते शूलं जीर्यति भोजने ॥ १२३ ॥

स्वस्थानापासून निघालेला कफ पित्ताशीं मिसळून वायूला घेऊन अन्नपचन होण्याच्या वेळीं शूळ उत्पन्न करितो. ह्या शूळाला पक्तिशूळ किंवा परिणामशूल असें म्हणतात.

---

## उदावर्तनिदान.

वातविण्मूत्रजृम्भाश्रुक्षवोद्गारवमीन्द्रियैः।
क्षुत्तृष्णाश्वासनिद्राणां धृत्योदावर्त्तसम्भवः ॥ १२४ ॥

अपानवायु, मल, मूत्र, जांभई, डोळ्यांतील अश्रु, शिंक, ढेकर, ओकारी, शुक्र, क्षुधा, तृषा, श्वास व निद्रा ह्यांचा अवरोध केला असतां उदावर्त नांवाचा रोग उत्पन्न होतो.

उदावर्ताचीं लक्षणें.

वातस्य रोधादाध्मानमूर्ध्वविट्कशिरोथरुक्।

वस्तौ मूत्रस्य जृम्भायाः शिरोरुगू दृग्रुजोऽश्रुणः ॥१२५॥
क्षवथोरिन्द्रियग्लानिरुद्गारस्यानिलार्तयः।
छर्दैः कुष्ठानीद्रियस्याश्मरीदृङ्मन्दता क्षुधः ॥ १२६ ॥
तृषोऽतितृष्णाश्वासस्य हृद्रुग् स्वापस्य जृम्भणम्।

अधोवायूचा रोध केला असतां पोट फुगतें. मलाचा अवरोध केला असतां मल आंतड्यांतून वर चढून तोंडाकडे येतो. मूत्रावरोध केला असतां बस्तीमध्यें कळ सुरू होते. जांभईचा अवरोध केला असतां डोकें दुखूं लागतें. अश्रूंचा अवरोध केला असतां डोळे दुखूं लागतात. शिंकेचा अवरोध केला असतां इंद्रियाला ग्लानि येते. ढकरेचा अवरोध केला असतां पोटामध्यें वातसंबंधीं नाना प्रकारच्या पीडा होतात. ओकारीचा अवरोध केला असतां कुष्ठ उत्पन्न होतें. शुक्राचा अवरोध केला असतां मुतखड्याचा आजार होतो. भुकेचा अवरोध केला असतां दृष्टीला मंदपणा येतो. तहानेचा अवरोध केला असतां अतिशय तहान लागते. श्वासोच्छ्वासाचा अवरोध केला असतां छातींत दुखूं लागतें. आणि झोपेचा अवरोध केला असतां जांभया फार येतात.

### उदावर्ताचें असाध्य लक्षण.

विड्वान्तिशूलतृड्ग्लानिक्षैण्ययुक्तं त्यजेदमुम् ॥ १२७ ॥

वांतीवाटे मळ येणें, पोटांत फार दुखणें, तहान अतिशय लागणें, ग्लानि व अत्यंत क्षीणता असा उदावर्ताचा आजार असाध्य म्हणून सोडून द्यावा.

---

## गुल्मनिदान.

हृन्नाभ्योरन्तरे ग्रन्थिः संचारी यदि वाऽचलः।
वृत्तश्चयोपचयवान्स गुल्मः पञ्चधा मतः॥ १२८ ॥

हृदय व नाभि ह्या दोहोंमधील अंतराच्या आसमंतांत इकडे तिकडे फिरणारी किंवा स्थिर असणारी व वाटोळी अशी गांठ उत्पन्न होते. ती कधीं वाढते व कधीं कमी होते. तिला गुल्म असें म्हणतात. हा वातादि तीन दोषांपासून तीन प्रकारचा, त्रिदोषापासून एक आणि रक्तजन्य एक असा पांच प्रकारचा आहे.

### गुल्माचीं पांच स्थानें.

तस्य पञ्चविधं स्थानं पार्श्वहृन्नाभिबस्तयः ।
दोषैर्व्यस्तैः समस्तैश्च स्त्रीणां रक्तेन पंचमः ॥ १२९ ॥

ह्या गुल्माचीं पांच स्थानें आहेत. तीं:—दोन्ही कुशी, हृदय म्हणजे काळीज, नाभि आणि बस्ती हीं होत. तो वातादि तीन दोषांपासून तीन प्रकारचा व त्रिदोषजन्य एक असा चार प्रकारचा आणि पांचवा रक्तगुल्म[1] म्हणून आहे तो. तो स्त्रियांना होतो. ह्याला आर्तवगुल्म असें म्हणतात.

### वातादि गुल्मांचीं लक्षणें.

जीर्णेऽन्ने वातजः कुप्येत्तस्मिन् जीर्यति पित्तजः ।
भुक्ते तु कफजो गुल्मः सर्वदा सर्वदोषजः ॥ १३० ॥

वातजन्य गुल्म खाल्लेल्या अन्नाचें पचन झाल्यावर प्रकुपित होतो ( पोटांत शूळ उत्पन्न करितो ). पित्तजन्य गुल्म खाल्लेल्या अन्नाचें पचन होत असतां शूळ उत्पन्न करितो. कफजन्य गुल्म जेवल्याबरोबर ठणकूं लागतो आणि त्रिदोषजन्य गुल्म सर्व काळ दुखत असतो.

### रक्तगुल्माचें लक्षण.

प्रसवार्तवपातानां काले या सात्म्यभोजना ।
वायुस्तद्रक्तमादाय गुल्मं निर्माति पैत्तवत् ॥ १३१ ॥

प्रसूत झालेल्या स्त्रीनें किंवा जिचा गर्भपात झाला आहे अशा स्त्रीनें अपथ्यकारक अन्न सेवन केलें असतां वायु प्रकुपित होऊन गर्भाशयांतील रक्ताला घेऊन पित्तगुल्माच्या लक्षणांनीं युक्त असा रक्तगुल्म उत्पन्न करितो.

### रक्तगुल्माचें लक्षण.

स्पंदते पिंडितो नाङ्गैः सशूलो गर्भचिह्नयुक् ।
गुल्मोऽसृजाश्चिकित्स्योऽसौ मासे तु दशमे गते ॥ १३२॥

---

१ निवळ रक्तजन्य ( आर्तवजन्य नव्हे ) गुल्म पुरुषांनाही होतो असें चरकाचें मत आहे.

हा रक्तगुल्म गर्भचिन्हांनीं युक्त असतो; म्हणजे हा गर्भाप्रमाणें फिरतो पण गर्भासारखा अवयवांनीं हालचाल करीत नाहीं. ह्यांत शूळ असतो. ह्या रक्तगुल्मावर दहा महिने झाल्यावर उपचार करावे.

### गुल्माचीं असाध्य लक्षणें.

श्वासशूलपिपासान्नविद्वेषो ग्रंथिगूढता ।
जायते दुर्बलत्वं च गुल्मिनो मरणाय वै ॥ १३३ ॥

श्वास, पोटांत दुखणें, तहान लागणें, अन्न खाण्याची इच्छा नसणें, गुल्माची गांठ एकाएकीं नाहींशी होणें आणि अशक्तपणा हीं लक्षणें झालीं असतां तो गुल्म असाध्य समजावा.

---

## हृद्रोगनिदान.

### हृद्रोगाची संप्राप्ति.

दूषयित्वा रसं दोषा विगुणा हृदयं गताः ।
हृदि पीडां प्रकुर्वन्ति हृद्रोगं तं प्रचक्षते ॥ १३४ ॥

उन्मार्गगामी झालेले दोष रसधातूला दूषित करून हृदयांत शिरून तेथें पीडा उत्पन्न करितात. ह्या विकाराला हृद्रोग असें म्हणतात.

### हृद्रोगाचे प्रकार.

स पञ्चधा पृथग्दोषैः समस्तैश्च कृमेरपि ।

हा हृद्रोग विकार वातादि तीन दोषांनीं तीन प्रकारचा, त्रिदोषजन्य एक व कृमिजन्य एक असा पांच प्रकारचा आहे.

### हृद्रोगाचे उपद्रव.

क्लमः सादो भ्रमः शोषो ज्ञेयास्तेषामुपद्रवाः ॥ १३५ ॥

थकवा येणें, अंग गलित होणें, घेरी येणें व तहान लागणें, हे हृद्रोगाचे उपद्रव आहेत.

---

१ ह्यामध्यें डोहाळे लागल्याचाही भास होतो. स्तनाग्रांचा रंग बदलतो.

२ ह्या पांचांचीं मुख्य लक्षणें:—वातजन्य हृद्रोगांत छातींत टोचल्यासारखी किंवा फोडल्यासारखी पीडा होते; पित्तजन्य हृद्रोगामध्यें हृदयांत दाह होतो; कफजन्य हृद्रोगांत छातींत जडपणा वाटतो व छाती ताठल्यासारखी होते; त्रिदोषजन्य हृद्रोगांत हीं तिन्ही दोषांचीं लक्षणें असतात. कृमियुक्त हृद्रोगांत हृदयांत पीडा फार असते व डोळ्याला काळिमा येते.

## मूत्रकृच्छ्रनिदान.

नालस्य मूले मध्ये वा रुद्धं वाऽग्रे सदाहरुक् ।
कणशश्चेत्स्रवेन्मूत्रं मूत्रकृच्छ्रं तदुच्यते ॥ १३६ ॥

मूत्रनलिकेच्या मुळापाशीं, मध्यंतरीं किंवा अग्रभागीं मूत्र गुंतून राहतें व अग्रभागाचे ठिकाणीं दाह व कळ उत्पन्न करीत थेंबथेंब बाहेर येतें. ह्या मूत्रविकाराला मूत्रकृच्छ्र असें म्हणतात.

### मूत्रकृच्छ्राचे प्रकार व लक्षणें.

मूत्रकृच्छ्राण्यष्ट दोषाश्मरीविट्शल्यशुक्रतः ।
दोषैर्लिंगं पृथक्सर्वैः

मूत्रकृच्छ्राचे आठ प्रकार आहेत. तें असे:—वातादि तीन दोषांनीं तीन, त्रिदोषजन्य एक, मुतखड्यामुळें होणारें एक, मलावरोधामुळें होणारें एक, शल्यजन्य एक आणि शुक्राच्या अवरोधामुळें होणारें एक.

कृच्छ्रे रुग्दाहगौरवम् ॥ १३७ ॥
द्विधारं मूत्रमश्मर्या विट्क्षोभाद्विड् विगन्धि तत् ।
क्षते हते वा शल्येन कृच्छ्रं स्यान्मूत्रवर्त्मनि ॥ १३८ ॥
तत्र रुद्धे मले शुक्रात्प्राप्तात्कृच्छ्रं परं सरुक् ।

वातजन्य मूत्रकृच्छ्रांत कळ फार जोरांत असते; पित्तजन्य मूत्रकृच्छ्रांत दाह फार असतो; कफजन्य मूत्रकृच्छ्रांत जडत्व असतें; त्रिदोषजन्य मूत्रकृच्छ्रांत तिन्हीही दोषांचीं लक्षणें असतात. अश्मरीजन्य मूत्रकृच्छ्रामध्यें लघवीच्या दोन धारा होतात. मलाचा अवरोध केल्यामुळें जें मूत्रकृच्छ्र होतें, त्यांत मुताला मळाची घाण येते. मूत्रनलिकेंत व्रण झाल्यामुळें, शस्त्राघातामुळें, किंवा कशाचा तरी आघात झाल्यामुळें होणाऱ्या मूत्रकृच्छ्रांत व त्याचप्रमाणें मलावरोधजन्य व शुक्राच्या अवरोधापासून होणाऱ्या मूत्रकृच्छ्रांत अत्यंत वेदना असतात.

### मूत्रकृच्छ्राचें असाध्य लक्षण.

बस्तिमेहनरुग्दाहाटोपैः कृच्छ्रं न सिद्ध्यति ॥ १३९ ॥

बस्तीमध्यें (ओटीपोटांत) व मूत्रनलिकेंत दाह होणें, ठणका लागणें व आंतून वेठ वळल्यासारखें वाटणें किंवा गुडगुड आवाज

होणें, हीं लक्षणें झालीं असतां तो मूत्रकृच्छ्ररोग असाध्य होतो.

---

## मूत्राघातनिदान.

### मूत्राघाताची संप्राप्ति.

मूत्रादि धृत्वा दुष्टेन रुद्धारुद्धा शनैःशनैः ।
मरुतोत्सृज्यते मूत्रं मूत्राघातस्तदा भवेत् ॥ १४० ॥

प्रकुपित झालेला वायु मूत्राचा अवरोध करून लघवीवाटे हळू हळु व थोडें थोडें मूत्र बाहेर सोडतो. ह्या विकाराला मूत्राघात असें म्हणतात. *

---

## अश्मरीनिदान.

### अश्मरीची संप्राप्ति.

वातो मूत्रगतं शुक्रं कफं वा शोषयेद्यदा ।
तदाऽश्मरी स्यात् क्रमशो गोपित्तेष्विव रोचना ॥ १४१ ॥

प्रकुपित झालेला वायु जेव्हां मूत्रामध्यें मिश्रित असलेला कफ किंवा शुक्र शुष्क करितो, तेव्हां गाईच्या पित्तापासून जसा गोरोचनाचा खडा बनतो त्याप्रमाणें त्या मूत्राचा खडा बनतो. ह्या

---

* ह्या मूत्राघाताचे तेरा प्रकार आहेत. ते (१) वातकुंडलिका—ह्या विकारामध्यें वायु बस्तीमध्यें कुंडलाकृति फिरतो. (२) अष्ठिला—वायु मूत्रमार्गाचा अवरोध करून गांठीसारखा होऊन राहतो. (३) वातबस्ति—ह्या विकारांत बस्तींत मूत्र कोंडल्यामुळें अतिशय कळा होतात. (४) मूत्रातीत—फार वेळ अवरोध झालेलें मूत्र हळू हळू बाहेर येतें. (५) मूत्रजठर—मूत्राचा वेग धारण केल्यामुळें अपान वायु कुपित होऊन पोट फुगवितो व मूत्राचा व गदाचा अवरोध करतो. (६) मूत्रोत्संग—मूत्र बस्तींत अगर मण्याजवळ गुंतून राहून रक्तमिश्रित थोडें थोडें बाहेर येतें. (७) मूत्रक्षय-ह्या विकारांत ठणका व दाह असतो. (८) मूत्रग्रंथी—मूत्रनलिकेच्या आंतील बस्तीकडील तोंडाजवळ मूत्राची गांठ बनते. (९) मूत्रशुक्र—शुक्रमिश्रित लघवी होते. (१०) उष्णवात—दाहयुक्त व पिंवळें किंवा तांबूस मूत्र होतें. (११) मूत्रासाद—कष्टानें पिंवळें, तांबडें, पांढरें किंवा दाट असें मूत्र होतें. (१२) विड्विघात—विगुण वायूनें मळ मूत्रमार्गांत येतो. त्यामुळें मलाच्या दुर्गंधीनें युक्त असें मूत्र होतें. (१३) बस्तिकुंडल—बस्ती स्थानापासून सुटून गर्भाप्रमाणें फुगून राहतो, तो दाबला असतां लघवीची धार येते.

विकाराला अश्मरी ( मुतखडा ) असें म्हणतात.

### अश्मरीचें लक्षण.

रुङ्नाभिसीवनीबस्तिमूर्धगोमेदकोपमम् ।
मूत्रकृच्छ्रं शीर्णधारं ज्वरश्चाश्मरिलक्षणम् ॥ १४२ ॥

नाभि, शिवण, बस्ती व मस्तक ह्या ठिकाणीं पीडा होणें, लघवी गोमेद मण्याप्रमाणें पिवळट होणें, उन्हाळे लागणें, लघवीची धार तुटक असणें आणि ज्वर येणें हीं मुतखड्याचीं लक्षणें आहेत.

### मुतखड्याचे प्रकार.

बालानां सा पृथक् दोषैर्यूनां शुक्रभवाश्मरी ।

निवळ मूत्रजन्य मुतखडा लहान मुलांना वातादि तीन दोषांमुळें तीन प्रकारचा होतो. आणि शुक्राश्मरी हा तरुण मनुष्यांनाच होतो.

### मुतखड्याचें असाध्य लक्षण.

नाभ्यण्डशोथरुग्बद्धमूत्रणात्त्वनया मृतिः ॥ १४३ ॥

ज्या मुतखड्याच्या आजारांत नाभि व अंड ह्या ठिकाणीं सूज येते व ठणका लागतो आणि लघवी बंद होते, तो मूतखडा असाध्य समजावा.

---

## प्रमेहनिदान.

आस्यासुखं स्वप्नसुखं दधीनि ग्राम्यौदकानूपरसाः पयांसि ।
नवान्नपानं गुडवैकृतं च प्रमेहहेतुः कफकृच्च सर्वम् ॥ १४४ ॥

सतत बसून राहणें, झोंप अतिशय घेणें, दहीं फार खाणें, ग्राम्य पशु व अनुपदेशांतील जनावरें ह्यांचें मांस किंवा मांसरस अतिशय खाणें, दूध फार पिणें, नवीन धान्याचें अन्न खाणें, गुळाचे पदार्थ आणि कफकारक असे कोणतेही पदार्थ जास्त खाणें ह्या सर्व गोष्टी प्रमेहाला कारणीभूत आहेत.

### प्रमेहाचें लक्षण.

मूत्रमिश्रं केवलं वा शुक्रं मेहति चेन्मुहुः ।
स प्रमेहोऽत्र भेदस्तु मूत्रवर्णविभेदतः ॥ १४५ ॥

मूत्रमिश्रित शुक्र किंवा निवळ शुक्र लघवीवाटे वरचेवर जातें,

ह्या विकाराला प्रमेह असें म्हणतात. ह्या प्रमेहाचे मूत्राच्या निरनिराळ्या रंगांवरून अनेक (वीस) प्रकार आहेत.

### प्रमेहांचीं नांवें.

जलेक्षुसान्द्रासवशुक्रपिष्टलालाशनैः सैकतशीततस्ते ।
मांजिष्ठहारिद्रकनीलकालक्षारास्रतो मज्जवसेभपौष्पात् ॥ १४६ ॥

उदकमेह, इक्षुमेह, सान्द्रमेह, सुरामेह, शुक्रमेह, पिष्टमेह, लालामेह, शनैर्मेह, सिकतामेह आणि शीतमेह ह्या दहा प्रमेहांना कफजन्य प्रमेह म्हणतात. मांजिष्टमेह, हारिद्रमेह, नीलमेह, कालमेह (शाईसारखी काळी लघवी होते तो), क्षारमेह, आणि रक्तमेह ह्या सहा प्रमेहांना पित्तजन्य प्रमेह म्हणतात. आणि मज्जामेह, वसामेह, हस्तिमेह व मधुमेह ह्या चार प्रकारचा प्रमेहांना वातजन्य प्रमेह म्हणतात.

### प्रमेहाचें साध्यासाध्य लक्षण.

साध्याः कफोत्था दश पित्तजाः षट्
याप्या न साध्याः पवनाच्चतुष्काः ।
समक्रियत्वाद्विषमक्रियत्वात्
महात्ययत्वाच्च यथाक्रमं ते ॥ १ ७ ॥

कफजन्य दहा प्रमेह साध्य आहेत. कारण कफ व मेदोधातु हे समान गुणाचे असल्यामुळें त्यांजवर एकच प्रकारच्या उपचाराचा परिणाम जलद होतो. पित्तजन्य सहा प्रमेह याप्य म्हणजे औषध आहे तोंपर्यंत बरे असणारे असे आहेत. कारण पित्त व मेदोधातु हे परस्परविरुद्ध गुणाचे असल्यामुळें ह्याजवरील उपचारही विषमच योजावे लागतात. आणि वातजन्य मेहांमध्यें सर्वच धातूंचें शोषण होतें, म्हणून ते असाध्य आहेत.

### प्रमेहाचे उपद्रव.

दोषप्रकोपचिह्नानि प्रमेहाणामुपद्रवाः ।

त्या त्या वातादि दोषानुरूप प्रमेहामध्यें जीं लक्षणें दिसून येतील तेच त्यांचे उपद्रव समजावे. (जसें–कफदोषानें अपचन, अरुचि, पीनस इत्यादि. पित्तदोषानें–दाह, तहान, थकवा, मूर्च्छा वगैरे; व वातदोषानें–उदावर्त, शूळ, निद्रानाश, शोष, खोकला, श्वास इ.)

### प्रमेहपीटिका.

शरावी कच्छपी पुत्रिण्यलजी च विदारिका ॥ १४८ ॥
मसूरी विनता जालिन्यपि विद्रधिसार्षपी ।
नामानुरूपाः पिडिका दशैमास्तदुपेक्षणात् ॥ १४९ ॥

शराविका, कच्छपिका, पुत्रिणी, अलजी, विदारिका, मसूरी, विनता, जालिनी, विद्रधी व सार्षपी, ह्या दहा प्रमेहपीटिका प्रमेहावर उपचार न केल्यामुळें होतात. त्यांचे आकार त्यांच्या त्यांच्या नांवानुरूप असतात.

---

### मेदोरोगनिदान.

मेदस्तु वर्धते श्लेष्महेतुभिस्तेन ना भवेत् ।
सर्वकर्मासमर्थोऽतिस्थूलस्फिगुदरस्तनः ॥ १५० ॥

कफकारक पदार्थांचें फार सेवन केल्यामुळें मनुष्याच्या शरीरांत मेद वाढून त्याचें ढुंगण, पोट व स्तन हे अवयव अतिशय मोठे होतात व तो अतिशय स्थूल झाल्यामुळें सर्व कामें करण्याविषयीं असमर्थ होतो. ह्या विकाराला मेदोरोग ह्मणतात.

---

### कृशत्वनिदान.

स्वभावदुर्बलो ह्येकः परो रोगादिदुर्बलः ।
स्वभावदुर्बले नास्ति चिकित्साऽस्त्यपरत्र सा ॥ १५१ ॥

कृशत्वाचे दोन प्रकार आहेत. एक स्वाभाविक कृशत्व (म्हणजे जन्मापासूनच शरीर कृश), आणि दुसरा रोगादिकांनीं ( आदिशब्दानें अतिशय उपास करणें, काळजी वाहाणें, वगैरे गोष्टी घ्याव्याच्या ) आलेलें कृशत्व. ह्या दोहोंपैकीं स्वभावतः जो कृश आहे त्याजवर औषधोपचार नाहीं, पण रोगादिकांनीं जो कृश झाला आहे त्याला पुष्ट होण्याचे उपाय आहेत.

---

### उदरनिदान.

#### उदराची संप्राप्ति.

मन्दाग्नेरहितैरन्नैरुदराण्यष्ट तानि तु ।
पृथग्दोषैः समस्तैश्च प्लीहबद्धक्षतोदकैः ॥ १५२ ॥

ज्याचा अग्नि मंद झाला आहे अशा मनुष्यानें अपथ्य अन्न सेवन केलें असतां त्यास आठ प्रकारचीं उदरें होतात. तीं वातादि तीन दोषांनीं तीन, त्रिदोषजन्य एक, आणि प्लीहोदर ( यांतच यकृताचा समावेश होतो ), बद्धोदर, क्षतोदर, आणि जलोदर हीं चार, असे एकंदर उदराचे आठ प्रकार आहेत.

### उदराचें सामान्य लक्षण.

वातविट्संगदौर्बल्योदरवृद्ध्यग्निमन्दता ।
पच्छोथबस्तिरुग्दाहाध्मानं सर्वोदराकृतिः ॥१५३॥

अपान वायु व मल ह्यांचा अवरोध होणें, कारणावांचून अशक्तपणा वाटणें, पोट मोठें होणें, अग्निमांद्य, पायावर सूज येणें, बस्तीमध्यें दुखणें, दाह होणें व पोट फुगणें हीं लक्षणें सामान्यतः सर्व उदरांमध्यें असतात.

### दोषपरत्वें उदराचीं लक्षणें.

कृष्णपीतार्जुना दोषैः शिराः स्युरुदरे क्रमात् ।

वातादि दोषांमुळें पोटावर निरनिराळ्या रंगांच्या शिरा दिसतात. म्हणजे वातदोषामुळें काळ्या, पित्तदोषामुळें पिवळ्या व कफदोषामुळें पांढऱ्या वर्णाच्या शिरा दिसतात.

### दूष्योदराचें लक्षण.

दुष्टाम्बुनखविड्लोमार्तवदूषीविषादिभिः ॥ १५४ ॥
दूष्योदरं त्रिलिङ्गं स्यान्नाभेरूर्ध्वं चितं सरुक् ।

घाणेरडें पाणी, तसेंच नख, मळ, केंस, स्त्रियांचें रज व दूषी विष हे पदार्थ पोटांत गेल्यानें दूष्योदर होतें. हें त्रिदोषजन्य असतें. हें नाभीच्या वर संचित होतें व ह्यामध्यें पोटांत दुखतें.

### प्लीहा व यकृत् ह्यांचीं स्थानें.

वामे जीर्णज्वरात्प्लीहा यकृद्दाल्यस्रतोऽन्यतः ॥ १५५ ॥

जीर्णज्वरामुळें डाव्या कुशीकडे प्लीहा ( पांथरी ) होते, आणि रक्तक्षोभामुळें उजव्या कुशीकडे यकृत वाढतें.

### बद्धगुदोदराचें लक्षण.

हृन्नाभिमध्ये निचितं दुष्टं वर्चोऽत्र लेपकृत् ।
वातेन न बहिर्याति तद्बद्धगुदमार्तिकृत् ॥ १५६ ॥

हृदय व नाभि ह्या दोहोंच्या मध्यभागीं आंतड्यांत मळ संचित होऊन तो आंतड्याला चिकटून राहतो. तो वातदोषामुळें शुष्क झाल्याकारणानें बाहेर येत नाहीं. ह्या विकाराला बद्धगुदोदर असें म्हणतात. ह्यामध्यें पोटांत दुखत असतें.

परिस्रावी उदराचें लक्षण.

अन्नाद्यागतशल्येन भिन्नमंत्रे जलं गुदात् ।
स्रवेन्नाभेरधोवृद्धं परिस्राव्युदरं हि तत् ॥ १५७ ॥

अन्नादिकांतून पोटांत कांहीं शल्य गेलें असतां त्याच्या घर्षणानें आंतड्याला छिद्र पडतें व त्यांतून स्रवणारें पाणी गुदावाटे बाहेर येतें. त्याला परिस्रावी उदर असें म्हणतात.

जलोदराचें लक्षण.

स्नेहपानाद्वमे रेकादत्यम्बु पिबतो हिमम् ।
अम्बुपूर्णाद् दृतिप्रख्यमधो नाभेर्दकोदरम् ॥ १५८ ॥

तेल तूप वगैरे प्राशन केल्यानंतर, वांति झाल्यानंतर, किंवा रेच झाल्यानंतर, जर अतिशय थंड पाणी पिण्यांत आलें, तर नाभीच्या खालील भागांत पाण्यानें भरलेल्या पखालीच्या स्वरूपाचें जलोदर उत्पन्न होतें.

उदराचें असाध्य लक्षण

पक्षाद्बद्धगुदं तूर्ध्वं सर्वं जातोदकं तथा ।
प्रायो भवत्यभावाय छिद्रान्त्रं चोदरं नृणाम् ॥ १५९ ॥

बद्धगुदोदर व ज्या उदररोगांत पोटामध्यें पाणी संचित झालें आहे म्हणजे ज्याला जलोदराचें स्वरूप आलें आहे अशीं सर्व उदरें, आणि छिद्रांत्रोदर ( ज्या उदरामध्यें आंतड्याला छिद्र पडलें आहे तें उदर—परिस्रावी उदर ) हीं सर्व उदरें पंधरां दिवसांनंतर मनुष्याचा नाश करितात.

---

## शोथनिदान.

अतिक्षाराम्लदुष्टाम्बुविरुद्धदधिमृद्गरैः ।
पञ्चकर्मापचाराद्यैर्जायते श्वयथुर्नृणाम् ॥ १६० ॥

खारट किंवा आंबट पदार्थांचें अतिसेवन केल्यानें, दूषित पाणी

पिण्यानें, दुधाशीं मासे खाणें यासारखें दुसरें परस्परविरुद्ध अन्न एक करून खाण्यानें, दहीं फार खाण्यानें, माती किंवा विष पोटांत शिल्लक राहिल्यानें, किंवा वमनविरेचनादि पंच कर्मे करतांना चूक होऊन कांहीं अपाय झाल्यामुळें मनुष्याला शोथरोग (सूज –नाळगुद) उत्पन्न होतो.

### शोथांचीं सामान्य लक्षणें.

शिरातनुत्वं वैवर्ण्यं रोमाञ्चोत्सेधगौरवम् ।
ऊष्मानवस्थितत्वं च सर्वं श्वयथुलक्षणम् ॥ १६१ ॥

शिरा मोठ्या होणें, शरीराचा वर्ण बदलणें, अंगावर कांटा येणें, अंगाला जडत्व असणें, सूज असलेले ठिकाणीं कधीं उष्णता भासणें कधीं न भासणें हीं सर्व शोथाचीं सामान्य लक्षणें आहेत.

### शोथाचे प्रकार.

नवधा तैः पृथग्द्वंद्वैः सर्वैर्घाताद्विषाच्च सः ।
प्रागुक्तलिंगैस्ते ज्ञेया यथाहेतुः स घातजः ॥ १६२ ॥
विषजः सविषप्राणिदंशमूत्रमलादिभिः ।

वातादि तीन दोषांनीं तीन प्रकारचा, प्रत्येक दोनदोन दोषांनीं दोन प्रकारचा, त्रिदोषजन्य एक, अभिघातजन्य (कांहीं लागून आलेला) एक व विषजन्य एक असे शोथाचे नऊ प्रकार आहेत. ह्यापैकीं वातादि[1] भेदांचीं लक्षणें मागें वातादिदोषप्रकोपांचीं जीं लक्षणें (पृ. १–३, श्लो. ३–८) सांगितलीं आहेत, त्यांवरून जाणावीं. आणि अभिघातज सुजेचें लक्षण जसा आघात झाला असेल त्यावरून जाणावें. विषजन्य सूज विषारी प्राण्यांचा दंश किंवा त्यांच्या मलमूत्रादिकांचा संसर्ग ह्या कारणांनीं होते.

---

१. वातजन्य सुजेमुळें त्वचेला खरखरीतपणा व काळसर तांबूसपणा असून सुजेला दिवसां जोर असतो. पित्तजन्य सुजेमुळें त्वचेचा रंग पिवळट पांढरा होतो, सुजेला गंधी असते, सुजेचा दाह होतो व ती लवकर पिकते. कफजन्य सुजेमुळें त्वचेला पांढुरकी असते, तिला कठिणपणा असतो, व तिला रात्रीं अधिक जोर असतो. द्विदोषज व त्रिदोषज सुजेची परीक्षा त्या त्या दोन दोन किंवा सर्व दोषांच्या लक्षणांवरून करावी. अभिघातजन्य सुजेंत लाली व पित्तजन्य सुजेचीं लक्षणें असतात.

### शोथाचें असाध्य लक्षण.

ऊर्ध्वगामी नरं पद्भ्यामधोगामी मुखात्स्त्रियम् ॥ १६३॥
उभयं बस्तिसंपातः शोथो हन्ति न संशयः ।

इतर आगंतुक कारणांवांचून, पायाकडून वर चढत जाणारी सूज पुरुषाचा नाश करिते, आणि त्याचप्रमाणें तोंडाकडून खालीं उतरणारी सूज स्त्रियांचा नाश करिते. आणि बस्तीच्या ठिकाणींच आरंभीं उत्पन्न होणारी सूज उभयतांचाही नाश करिते.

### शोथाचे ( सुजेचे ) उपद्रव.

छर्दिः श्वासोऽरुचिस्तृष्णा ज्वरोऽतिसार एव च ॥ १६४ ॥
सप्तकोऽयं सदौर्बल्यः शोथोपद्रवसंग्रहः ।

ओकारी, श्वास, अरुचि, तहान, ज्वर, अतिसार आणि अशक्तपणा हे सात शोथाचे उपद्रव आहेत.

---

## कुरंटकनिदान.

वायुर्वंक्षणतः प्राप्य मुष्के मुष्कधराः शिराः ॥ १६५ ॥
प्रपीड्य वृद्धिं कुरुते मुष्कयोः स कुरंटकः ।

वंक्षणसंधीपासून निघालेला वायु अंडांत शिरून अंडांतील शिरांवर दाब टाकून अंड मोठें करितो, ह्या विकाराला कुरंटक ( अंडवृद्धि ) असें म्हणतात.

### कुरंटकाचे प्रकार.

दोषास्रमेदोमूत्रांत्रैः स गदः सप्तधा स्मृतः ॥ १६६ ॥

वातादि तीन दोषांपासून तीन प्रकारचा, रक्तजन्य एक, मेदोजन्य एक, मूत्रजन्य एक आणि अंत्रजन्य ( आंतडें अंडांत उतरल्यामुळें होणारा ) एक असा हा कुरंटक रोग सात प्रकारचा आहे.

### वातादि कुरंटकांचीं लक्षणें.

रुग्दाहकंडूर्दोषेभ्योऽस्रात्कृष्णस्फोटभागशः ।
मेदोजः कफवन्मौत्रो धृतं तद्यंत्रणात्सृजेत् ।
आघातादेर्मरुन्नीत्वा क्षुद्रांत्रं वंक्षणादधः ॥ १६७ ॥
अंत्रवृद्धिं करोत्यत्र यंत्रणात्स्यात्सरुग्ध्वनिः ।

वातदोषामुळें कुरंटकामध्यें ( अंडवृद्धीमध्यें ) ठणका असतो. पित्तदोषामुळें दाह असतो. कफदोषामुळें कंडू असतो. रक्तदोषामुळें

अंडावर काळे फोड येतात. मेदोजनित अंडवृद्धीमुळें कफजनित अंडवृद्धीसारखींच लक्षणें होतात. मूत्रजन्य अंडवृद्धीमध्यें अंडांत सांठलेलें मूत्र अंड दाबलें असतां बाहेर येतें. आघातादिकांनीं क्षुद्र ( लहान ) आंतडें वंक्षण-संधींतून खालीं अंडांत उतरतें, त्याला अंत्रवृद्धि म्हणतात. तें दाबलें असतां पीडा होते व वाजतें.

---

## वर्ध्मनिदान.

वंक्षणग्रन्थिमनिलः करोति वर्ध्मनामकम् ॥ १६८ ॥

वंक्षणसंधीमध्यें प्रकुपित झालेला वायु त्याच ठिकाणीं एकप्रकारची गांठ उत्पन्न करितो त्याला वर्ध्म ( वळ किंवा बद ) म्हणतात.

---

## श्लीपदनिदान.

पादशोफः श्लीपदं तैः पृथक् सर्वैः कफोल्बणैः।

कफजन्य आहारविहारादिकांनीं वातादि दोष प्रकुपित होऊन पायाच्या ठिकाणीं मोठी सूज उत्पन्न करितात. ह्या विकाराला श्लीपद असें म्हणतात. हें वातादि तीन दोषांमुळें तीन प्रकारचें व त्रिदोषजन्य एक असें चार प्रकारचें आहे.

तत्कर्णकरनेत्रौष्ठशिश्ननासास्वपि क्वचित् ॥ १६९ ॥

हा श्लीपद रोग कान, हात, डोळे, ओठ, शिश्न व नाक ह्या ठिकाणीं देखील क्वचित उत्पन्न होतो.

---

## व्रणशोथनिदान.

प्राग्रूपमस्य शोथो क्वाप्यङ्गे स्फुटितस्तु सः।

रूपं षोढा पृथक् सर्वं दोषास्रागन्तुकं च तत् ॥ १७० ॥

शरिराच्या कोणत्याही भागीं जर विनाकारण सूज आली तर तें व्रणाचें पूर्वरूप असतें. म्हणून त्या सुजेला व्रणशोथ असें ह्मणतात. ती सूज फुटली असतां त्या जखमेला व्रण असें म्हणतात. हा व्रणरोग वातादि तीन दोषांनीं तीन प्रकारचा, त्रिदोषजन्य एक, रक्तजन्य एक व आगंतुक एक असा सहा प्रकारचा आहे.

### व्रणशोथ पक्व होण्याचें लक्षण.

विषमं पच्यते वातात्पित्तस्तस्त्वाचिरं चिरम् ।
कफजः पित्तवच्छोथौ रक्तागन्तुसमुद्भवौ ॥ १७१ ॥

वातजन्य व्रणशोथ विषम रीतीनें ह्मणजे लवकर किंवा उशीरां पिकतो व सर्वत्र सारखा पिकत नाहीं. पित्तजन्य व्रणशोथ जलद पिकतो. कफजन्य व्रणशोथ फार वेळानें पिकतो. आणि रक्तजन्य व आगंतुक व्रणशोथ पित्तजन्य व्रणशोथाप्रमाणें लवकर पिकतो.

### आम व्रणशोथाचें लक्षण.

मन्दोष्णताल्पशोफत्वं काठिन्यं त्वक्सवर्णता ॥
मंदवेदनता चैतदामशोथस्य लक्षणम् ॥ १७२ ॥

सुजेला उष्णता कमी भासणें, सूज कमी असणें, सुजेला कठीणपणा असणें, सुजेचा वर्ण त्वचेच्या वर्णासारखा असणें आणि सुजेंत वेदना मंद असणें हीं अपक्व असलेल्या वणशोथाचीं लक्षणें आहेत.

### पक्व होणाऱ्या व्रणशोथाचें लक्षण.

अतिदाहरुजातोदशोषभेदविवर्णता ॥
तृष्णा ज्वरश्च शोथस्य पच्यमानस्य लक्षणम् ॥ १७३ ॥

सुजेंत अतिशय दाह असणें, ठणका, सुजेंत टोचल्यासारखें वाटणें, अंग शुष्क होणें, फुटणें, त्वचेचा वर्ण बदलणें, तहान लागणें, व ताप येणें हीं लक्षणें व्रणाची सूज पिकत असतां होतात.

### पक्व व्रणशोथाचें लक्षण.

कंड्वल्युद्भवस्तोदो रुक्शान्त्यारुण्यनम्रता ।
यंत्रणात्पूयचलनं पक्वशोथस्य लक्षणम् ॥ १७४ ॥

सुजेला कंडू उत्पन्न होणें, सुजेवर सुरकुत्या पडणें, सुजेमध्यें टोचल्याप्रमाणें पीडा होणें, सुजेंतील ठणका बंद होणें, सूज दबणें, आणि त्या पिकलेल्या सुजेवर दाबलें असतां पू इकडे तिकडे जाणें हीं लक्षणें पक्व झालेल्या व्रणाचीं आहेत.

### दोषपरत्वें व्रणलक्षण.

सावर्ण्यं रुक्त्वगाढत्वमल्पपाकाकृतिः पुनः ।
रुक्पाकपूयास्तैस्तेनारुः पाके तु त्रिदोषरुद् ॥ १७५ ॥

व्रणशोथामधील रक्ताचा पाक झाला असतां वरील त्वचेचा वर्ण न बदलतां आंत ठणका असतो व त्वचा जाड होते. आणि त्यांत वातप्राधान्य असल्यामुळें ठणका असतो, पित्तदोषामुळें तो पक्व होतो व कफदोषामुळें पू होतो. म्हणून व्रण पक्व होत असतां तिन्ही दोषांचीं लक्षणें होतात.

### व्रणाचे प्रकार.

शारीरागन्तुभेदेनाद्विधाऽयं तु दोषजम् ।
परशस्त्रादिकं त्वत्र दोषे रुग्दाहगौरवम् ॥ १७६ ॥

एक शारीरिक व दुसरा आगंतुक, असे व्रणाचे दोन प्रकार आहेत. त्यांत आगंतुक व्रण शस्त्रादिकांच्या आघातानें होतो. दोन्हीही व्रणांमध्यें वातादि दोषांनीं अनुक्रमें ठणका, दाह व जडत्व हे विकार होतात.

### रक्तव्रणाचें लक्षण.

रक्तस्रावो रक्तजेऽथ

रक्तजन्य व्रणांतून रक्तस्राव होतो.

### आगंतुक व्रणाचे प्रकार.

आगन्तुजं तच्च षड्विधम् ।
छिन्नं भिन्नं क्षतं विद्धं पिच्चितं घृष्टमित्यपि ॥ १७७ ॥

आगंतुक व्रणाचे छिन्न ( तोडलेला ), भिन्न ( फोडलेला ), क्षत ( भोंक पडलेला ), विद्ध ( टोचण्यानें झालेला ), पिच्च ( हाड-पिचलेला ) आणि घृष्ट ( घासून–खरडून झालेला ) असे हे सहा प्रकार आहेत.

### आगंतुक व्रणाचें लक्षण.

पातांत्रभेदस्वल्पास्वैंधच्चूर्णेन घर्षणात् ।

शस्त्राचा घाव पडल्यानें जो व्रण होतो त्याला छिन्नव्रण म्हणतात. ज्यांत शस्त्रादिकांनीं जखम होऊन आंतील आंतड्याला इजा होते त्याला भिन्नव्रण असें म्हणतात. भाला वगैरे शल्य भोसकल्यानें जें लहानसें छिद्र पडतें त्याला क्षतव्रण असें म्हणतात. सुई वगैरे सूक्ष्म टोकांचीं शस्त्रें टोंचल्यामुळें जो व्रण होतो, त्याला

विद्धव्रण म्हणतात. ज्यामध्यें हाड फुटून त्याचा चुरा होतो त्याला पिच्चव्रण असें म्हणतात. आणि खरडल्यानें जी जखम होते त्याला घृष्टव्रण असें म्हणतात.

### सशल्य व्रणाचें लक्षण.

सशल्यं यंत्रणात्सास्रं बुद्बुदं चट्चटध्वनि ॥ १७८ ॥

जो व्रण दाबला असतां त्यांतून रक्त बाहेर येतें व तें येतांना बुडबुडे येतात व चट् चट् असा आवाज होतो, त्या व्रणामध्यें शल्य राहिलें आहे म्हणून समजावें.

### व्रणरोगाचे उपद्रव.

तृड्ज्वरोन्मादरुङ्मोहरेकहिक्कापतानिकाः ।
कम्पच्छर्दिश्वासकासपक्षाघातहनुग्रहाः ॥ १७९ ॥
शिरास्तम्भो विसर्पश्चोपद्रवाः षोडशारुषः ।

तहान, ज्वर, उन्माद, ठणका, मूर्च्छा, रेच, उचकी, धनुर्वात, कंप, ओकारी, श्वास, खोकला, अर्धांग वायु, हनुग्रह, ( दांतखिळी बसणें ), मस्तक ताठणें आणि विसर्प ( इसब ) हे व्रणाचे सोळा उपद्रव आहेत.

### व्रणाचें असाध्य लक्षण.

सर्वैरेतैर्व्रणोऽसाध्यो याप्योऽर्धैश्च सुखस्तथा ॥ १८० ॥

वर सांगितलेले सर्व उपद्रव ज्या व्रणरोगांत असतील तो व्रण-रोग असाध्य समजावा. ह्यांतील निम्मे उपद्रव असले तर तो याप्य ( औषधाचे सतत सेवनानें त्रास न देणारा असा ) समजावा. व त्याहून कमी उपद्रव असले तर तो व्रण सुखसाध्य समजावा.

---

## भग्ननिदान.

भग्नं द्विधा सन्धिकाण्डभेदात्पोढात्र सन्धिजम् ।
विवर्तितं च उत्क्षिप्तं तिर्यक्क्षिप्तमधोऽपि च ॥ १८१ ॥
विश्लिष्टमुत्पिष्टमिति

भग्न ( हाड मोडणें ) ह्याचे दोन प्रकार आहेत. एक सांध्या-पासून हाड निखळणें, ह्याला संधिभग्न असें म्हणतात. आणि दुसरा प्रकार–हाड मध्येंच मोडून तुकडा पडणें. ह्याला कांडभग्न म्हणतात.

त्यापैकीं संधिभग्नाचे विवर्तित, उत्क्षिप्त, तिर्यक्क्षिप्त, अधःक्षिप्त, विश्लिष्ट, आणि उत्पिष्ट असे सहा प्रकार आहेत.

### कांडभग्नाचे प्रकार.

काण्डं द्वादशधा तु तत् ।
अस्थिझल्लीकर्कटाश्वकर्णचूर्णितपिच्चितम् ॥ १८२ ॥
काण्डभग्नं द्विधा छिन्नवक्त्रं चाप्यतिपातितम् ।
मज्जागतं च स्फुटितं यथास्वं लक्षयेदिदम् ॥ १८३ ॥

कांडभग्नाचे अस्थि, झल्ली, कर्कटक, अश्वकर्ण, चूर्णित, पिच्चित, कांडभग्न, द्विधाभग्न, छिन्नवक्त्र, अतिपातित, मज्जागत आणि स्फुटित असे बारा प्रकार आहेत. हीं त्यांचीं नांवें अन्वर्थकच आहेत. म्हणून त्यांच्या अर्थाला अनुसरून त्याचीं लक्षणें जाणावीं.

---

## नाडीव्रणनिदान.

उपेक्षणाद्योऽतिदूरं गतो नाडीं च यो व्रणः ।
नाडीव्रणः स विज्ञेयः सपूयक्लेददाहरुक् ॥ १८४ ॥

व्रणाची उपेक्षा केली असतां तो व्रण आंतील भागांत लांबवर बारीक छिद्ररूपानें जातो, त्याला नाडीव्रण असें म्हणतात. ह्यांतून पू वहातो, तो नेहमीं ओलसर असतो, त्याचा दाह होतो व त्याला ठणका असतो.

---

## भगंदरनिदान.

गुदस्य द्व्यङ्गुले क्षेत्रे पार्श्वतः पिडिकार्तिकृत् ।
भिन्नो भगंदरो ज्ञेयः स च पञ्चविधो मतः ॥ १८५ ॥

गुदाच्या दोन्ही कडांच्या दोन दोन बोटें प्रदेशांत एक फोड येतो. तो फार ठणकतो. तो फुटला म्हणजे त्याला भगंदर असें म्हणतात. ह्याचे पांच प्रकार आहेत.

### पांचही भगंदरांचीं लक्षणें.

सरुक्क्लेदोऽनेकमुखो वातात्स्याच्छतपोनकः ।

ज्या भगंदरांत ठणका व ओलावा असतो व ज्याला बारीक बारीक अनेक छिद्रें असतात, तें वातजन्य भगंदर समजावें. ह्याला

'शतपोनक' असें म्हणतात.

उष्ट्रग्रीवस्तु पित्तेन परिस्रावी कफेन च ॥ १८६ ॥

पित्तदोषामुळें जें भगंदर होतें, त्याची गति उंटाच्या मानेप्रमाणें आंतून वक्र असते, त्याला 'उष्ट्रग्रीव' असें म्हणतात. कफजन्य भगंदरामध्यें आंतून पू जात असतो, म्हणून त्याला 'परिस्रावी' असें म्हणतात.

शम्बूकावर्तकोन्मार्गगौ तु स्यातां त्रिदोषजौ।

शंबुक व आवर्तक ह्या नांवाचीं भगंदरें उन्मार्गगामीं म्हणजे पाहिजे तिकडे गति करणारीं असतात. ह्यांची गति त्यांच्या नांवांप्रमाणें असते. हीं दोन्ही त्रिदोषजन्य आहेत.

भगंदराचें असाध्य लक्षण.

शुक्रमूत्रवहौ दुःखौ न साध्यौ दूरगौ भृशम् ॥ १८७ ॥

ज्या भगंदरांच्या छिद्रांतून शुक्र व मूत्र हीं वाहूं लागलीं आहेत व ज्यांची गति फार लांबवर गेली आहे, तीं भगंदरें असाध्य समजावीं.

---

## गलगंडनिदान.

गलैकदेशे श्वयथुरपाको गलगण्डकः।
मेदोवातकफैस्त्रेधा कण्डूरुग्गौरवं क्रमात् ॥ १८८ ॥

गळ्याच्या एका बाजूला कानाच्या खालीं जी सूज येते, व जी पिकत नाहीं, तिला गलगंड ( गालगुंड ) असें म्हणतात. हें मेदोजन्य, वातजन्य व कफजन्य असें तीन प्रकारचें आहे. त्यापैकीं मेदोजन्य गालगुंडांत कंडू असतो, वातजन्य गालगुंडांत ठणका असतो आणि कफजन्य गालगुंडांत जडत्व असतें.

---

## ग्रंथि व अर्बुद यांचें निदान.

ग्रन्थिः कुत्राप्यपाकोऽङ्गे दोषास्रागन्तुमेदसः।

शरीराच्या कोणत्याही भागावर गांठ उत्पन्न होऊन ती पिकली नाहीं, तर तिला ग्रंथि असें म्हणतात. हा वातादि तीन दोषांनी

तीन प्रकारचा, रक्तजन्य एक, आगंतुक ( आघात लागून झालेला ) एक व मेदोजन्य एक, असा सहा प्रकारचा आहे.

स एव पाक्यर्बुदः स्यात्तद्वत्षोढा मुहुः स्रवन् ॥ १८९ ॥

हाच ग्रंथि कालांतरानें फार मोठा होऊन फार दिवसांनीं पिकतो, त्याला अर्बुद ( आवाळू ) असें म्हणतात. हा वरचेवर पाझरतो. ह्याचेही ग्रंथीप्रमाणेंच सहा प्रकार आहेत.

---

## गंडमालानिदान.

गण्डमाला गलेऽनेकैर्गण्डैर्मेदःकफोत्थितैः ।
चिरपाकिभिरेषैव चिरस्थाऽपचिका भवेत् ॥ १९० ॥

मेद व कफदोष ह्यांपासून गळ्याच्या आसपासच्या प्रदेशांत अनेक गांठी उठतात. त्यांना गंडमाळा असें म्हणतात. ह्याच गांठी फार दिवसपर्यंत न पिकतां तशाच राहतात तेव्हां त्यांना ‘ अपची ’ असें म्हणतात.

---

## विद्रधिनिदान.

श्वयथुर्मुष्टिवद्दाहरुगाढ्यो विद्रधिर्द्विधा ।
बहिरंतश्च षोढा तैः पृथक्सर्वैरसृक्क्षतात् ॥ १९१ ॥

ज्यामध्यें दाह व ठणका आहे अशी जी मुठीच्या आकाराची सूज येते, त्या सुजेला विद्रधि ( करट ) असें म्हणतात. ह्याचे बाह्य विद्रधि व अंतर्विद्रधि असे दोन प्रकार आहेत. हे दोन्ही विद्रधि वातादि तीन दोषांनीं तीन प्रकारचे, त्रिदोषजन्य एक, रक्तजन्य एक आणि आघातजन्य एक असे सहा प्रकारचे आहेत.

### विद्रधींचीं लक्षणें.

बाह्यः सपक्वोव्रणवत्स्यात्

बाह्य विद्रधि पिकला म्हणजे व्रणाप्रमाणें होतो. ( म्हणजे त्याज-वर उपचार व्रणाप्रमाणें करावे. )

आन्तरस्तु करोत्यसौ ।
बस्तौ कृच्छ्रं क्लोम्न्युदन्यां पार्श्वबंधं तु वृक्कयोः ॥ १९२॥
पायावपानविड्रोध कुक्षावनिलजा रुजः ।

**नाभ्यां हिक्कां हृदि श्वासं प्लीह्नि श्वासाप्रवर्तनम् ॥ १९३ ॥**
**यकृत्यजस्रं कसनं वंक्षणे तु कटिग्रहम् ।**

अंतर्विद्रधी हा बस्तीच्या भागांत ( ओटीपोटांत ) झाला असतां मूत्रकृच्छ्र रोग उत्पन्न करितो. क्लोम (पिपासा)-स्थानीं ( उजवेकडील फुफ्फुसाचे ठिकाणीं ) झाला असतां तहान फार लागते. वृक्कस्थानीं (दोन्ही कुशींतील गोळ्यासारख्या, मूत्रपिंडनामक, एका अवयवाचे ठिकाणीं ) झाला असतां बरगड्या जखडल्यासारख्या होतात. गुद-स्थानीं झाला असतां अपान वायु व मल ह्यांचा अवरोध होतो. कुशींत झाला असतां वातजनित वेदना होतात. नाभीच्या ठिकाणीं झाला असतां उचकी लागते. हृदयाचे ठिकाणीं झाला असतां श्वास उत्पन्न होतो. प्लीहेचे ( पांथरीचे ) ठिकाणीं झाला असतां श्वासो-च्छ्वासाचा अवरोध होतो. यकृताचे ठिकाणीं झाला असतां सारखा ठसका लागतो. आणि वंक्षणसंधीचे ठिकाणीं झाला असतां कंबर जखडल्यासारखी होते.

स पक्को वामयेदूर्ध्वं नाभेः संचारयेदधः ॥ १९४ ॥

हा पिकला असतां नाभीच्या वरील भागीं असल्यास त्यांतील पू वगैरे द्रव वांतींतून बाहेर पडतो, आणि तो नाभीच्या खालीं असल्यास मलमार्गानें बाहेर पडतो.

### विद्रधीचें असाध्य लक्षण.

नाद्यः साध्यश्च मर्मोत्थो विद्रधिर्भूर्युपद्रवः ।

नाभीच्या वर होणारा अंतर्विद्रधि फुटून, द्रव तोंडाकडे आला तर तो असाध्य समजावा. त्याचप्रमाणें मर्मस्थानीं झालेला व ज्या-मध्यें फार उपद्रव आहेत, तो विद्रधि असाध्य समजावा.

### स्तनविद्रधीचें लक्षण.

विद्रधिः स्त्रीस्तने रक्तः शोथरुग्दाहपाककृत् ॥ १९५ ॥

स्त्रियांच्या स्तनाचे ठिकाणीं ( दूध सांठून राहिल्यामुळें ) व इतर कांहीं कारणांनींही ) विद्रधि होतो. त्याला आरक्तता असते, सज असते, दाह होतो व तो पिकतो.

---

## कुष्ठनिदान.

विरुद्धाहारदुष्कर्मपंचकर्मापचारतः ।
दुष्टस्त्रीमद्यमांसाम्बुसेवाद्यैः कुष्ठसंभवः ॥ १९६ ॥

गुणानें परस्परविरुद्ध असलेले पदार्थ ( दूध व खिचडी वगैरे ) मिसळून खाण्यानें, पापकर्म केल्यानें, वमनविरेचन इत्यादि जीं शरीरशुद्धीचीं पंचकर्मे त्यांचा अपायकारक परिणाम झाला असतां, तसेंच रोगी किंवा आपल्याशीं शत्रुत्वानें वागणारी स्त्री, दूषित मद्य, नासकें कुचकें मांस, व दूषित पाणी ह्यांचें सेवन केलें असतां कुष्ठरोग उत्पन्न होतो.

### महाकुष्ठांचें सामान्य लक्षण.

कपालाद्युद्भवो रक्तदुष्टिरिन्द्रियवैकृतम् ।
पांगुल्याबल्यकौण्यं च महाकुष्ठाकृतिश्चिरात् ॥ १९७ ॥

कापालिक, औदुंबर, सितमंडल, कांकण, ऋष्यजिव्ह, पुंडरीक व दद्रु हीं सात महाकुष्ठें झालीं असतां रक्त बिघडतें, इंद्रियें विकल होतात, पांगळेपणा येतो, अशक्तता येते आणि त्यास बरेच दिवस झाले असतां बोटें गळूं लागतात.

### महाकुष्ठांचीं निरनिराळीं लक्षणें.

कपालं वातवद्रूक्षं पित्तादौदुंबरं च तत् ।
कफात्सितं मण्डलं तद्गुञ्जावत् काकणं सरुक् ॥ १९८ ॥
वातपित्ताद् ऋष्यजिह्वं सकम्पमरुणासितम् ।
कफपित्तात्पुण्डरीकं पुण्डरीकदलोपमम् ॥ १९९ ॥
दद्रूः कण्डूत्थपिडिकायुक् सरन् मण्डलात्ततः ।
सप्तैतानि महाकुष्ठानि

कपालकुष्ट-हें वातदोषप्रधान असून रुक्ष असतें. औदुंबरकुष्ट-हें पित्तदोषप्रधान असून लाल असतें. सितमंडल कुष्ट-हें कफजन्य असून त्याचीं मंडलें पांढरीं असतात. कांकणकुष्ट त्रिदोषजन्य असून गुंजेसारखें लाल असतें, व त्यांत वेदना असतात. ऋष्याजिव्हकुष्ठ-हे वातपित्तजन्य असून त्यामुळें कफ असतो व त्याचा रंग तांबूस पांढरा असतो. पुंडरीक कुष्ठ-हें कफपित्तजन्य असतें. तें पांढऱ्या कमळाच्या पाकळीसारखें असतें. दद्रुकुष्टामध्यें कंडु फार असून

त्यांत पुटकुळ्या असतात. त्याचीं मंडलें असतात व तीं वाढत वाढत पसरतात. हीं सात महाकुष्ठें आहेत.

क्षुद्र कुष्ठांचीं नांवें व लक्षणें.

इभचर्मेभचर्मवत् ॥ २०० ॥
किणवत्किटिभं चर्मदलं तु दरणात्त्वचः ।
पामा पाण्योः कंडुरुची विचर्ची सर्वजस्तु तैः ॥ २०१ ॥
तैर्मेढ्रपार्श्वजैः कच्छुः पाददारैर्विपादिका ।
सिध्मोर्ध्वदेहे कषणाद्दालयलाबूप्रसूनवत् ॥ २०२ ॥
शतारुरल्पारुर्भिः स्यादलसं शोणमण्डलम् ।
एककुष्ठं मत्स्यखंडोपमं श्वित्रं ततः सितम् ॥ २०३ ॥

इभचर्म कुष्ठामध्यें मनुष्याची त्वचा हत्तीच्या त्वचेप्रमाणें होते. किट्टिभ कुष्ट हें व्रणाच्या डागाप्रमाणें असतें. चर्मदल कुष्ठामध्यें त्वचेला चिरा पडून त्वचा विदीर्ण होते. पामा ( खरूज ) ही हाताला फार येते. हिजमध्यें कंडू फार असतो व अरुचि असते. विचर्चिका ही त्रिदोषजन्य असते. त्याचप्रमाणें त्रिदोषापासून शिस्नाच्या दोन्ही बाजूंस ज्या पुटकुळ्या होतात, त्यांना कच्छु असें म्हणतात. पायाच्या तळव्याला चिरा पडतात त्यांला विपादिका असें म्हणतात. शरीराच्या वरील भागांत ( छातीवर वगैरे ) कंडु उत्पन्न होऊन भोपळयाच्या फुलाच्या रंगासारखें जें कुष्ठ होतें, त्याला सिध्म ( शिबें ) म्हणतात. शतारुकुष्ट हें लहानलहान अशा अनेक व्रणांनीं युक्त असतें. लाल मंडलांनीं युक्त जें कुष्ठ त्याला अलसकुष्ठ ( किलासकुष्ट ) असें म्हणतात. जें कुष्ठ माशांच्या खवल्याप्रमाणें असतें, त्याला एककुष्ट असें म्हणतात. आणि जें श्वेतवर्ण असतें त्याला श्वित्रकुष्ठ ( श्वेतकुष्ठ ) असें म्हणतात.

---

## उपदंशनिदान.

हस्तदंतनखाघातयोनिदोषादिभिर्मलाः ।
पृथक्सर्वैर्व्रणाः कुर्युर्लिंगे वर्तिं च पंचमीम् ॥ २०४ ॥

हात, दांत किंवा नखें ह्यांच्या आघातानें किंवा योनिदोषामुळें प्रकुपित झालेले वातादि दोष वेगवेगळा तीन प्रकारचा, त्रिदो-

षजन्य एक व लिंगवर्ती नांवाचा एक असा पांच प्रकारचा उपदंशरोग उत्पन्न करितात. ह्यांत पहिल्या चार प्रकारांमध्यें लिंगाचे ठिकाणीं व्रण उत्पन्न होतात. व पांचव्या स्थितींत लिंगावर कोंबड्याच्या डोक्यावरील तुऱ्याप्रमाणें अंकुर होतात. त्यांनाच लिंगवर्ति असें म्हणतात.

### उपदंशाचे उपद्रव.

अस्थिशोथरुजोदाहसन्धिग्रहमरूंषि च ।
केशलोमप्रपातश्च वैवर्ण्यं चोपदंशतः ॥ २०५ ॥

हाडें ठणकणें, इंद्रियाचे ठिकाणीं सूज व ठणका असणें, दाह, सांधे धरणें, चट्टे उत्पन्न होणें, केस व अंगावरील लव गळणें, आणि शरीराचा वर्ण बदलणें हे उपदंशांतील उपद्रव आहेत.

---

## शीतपित्तनिदान.

वरटीदष्टवच्छोथाः कण्डूछर्दिज्वरप्रदाः ।
शीतपित्तनिमित्ताः स्युरुदर्दा वपुषो बहिः ॥ २०६ ॥

गांजणी चावल्याप्रमाणें अंगावर गांधी उठून अंग सुजतें, त्यामुळें अंग खाजतें, ओकारी व ज्वर येतो. हा विकार शीतपित्तापासून होतो. त्याला उदर्द असें म्हणतात. हा विकार त्वचेवर होतो.

---

## आम्लपित्तनिदान.

अविपाकक्लमोत्क्लेदतिक्ताम्लोद्गारिगौरवैः ।
हृत्कण्ठदाहारुचिभिरम्लपित्तं वदेद्भिषक् ॥ २०७ ॥

अन्नाचें अपचन, थकवा, तोंडाला पाणी सुटणें, कडवट व आंबट असे ढेकर येणें, अंगाला जडत्व, छातींत व घशाशीं जळजळणें, आणि अरुचि हे विकार होऊं लागले असतां आम्लपित्त झालें आहे असें समजावें.

---

## विसर्पनिदान.

अतिदाहरुजारागस्रावारुच्यरतिप्रदाः ।
क्षुद्रव्रणाविसर्पाः स्युः सर्वतः परिसर्पणात् ॥ २०८ ॥

शरीराच्या कोणत्याही भागावर बारीक फोड येऊन ते फुटतात

व त्यांचे लहान लहान व्रण होतात, ते पसरत पसरत वाढतात, त्याला विसर्प असें म्हणतात. त्यामुळें त्या ठिकाणीं अतिशय दाह होतो, ठणका असतो, लाली असते, त्यांतून स्राव होतो आणि त्यामुळें अरुचि व अस्वस्थता वाटते.

---

## मसूरिकानिदान.

ज्वरच्छर्दिभ्रमाद्याः स्युर्बालानां तु मसूरिकाः।
पद्धस्ततलदृश्यास्ता न सिध्यंत्यनलक्षयात् ॥ २०९ ॥

ज्वर, ओकारी व घेरी ह्या विकारांनीं युक्त अशा मसूरिका ( देवी ) मुलांना येतात. त्या तळपाय व तळहात ह्या ठिकाणीं आल्या असतां व अग्निमांद्य झालें असतां साध्य होत नाहींत.

---

## विस्फोटकानिदान.

अग्निदाहादिव स्फोटा विस्फोटाः स्युर्महारुजः।
पृथग्द्वंद्वसमस्तैस्तैरस्राच्चैते विषोपमाः ॥ २१० ॥

विस्तवानें भाजल्यासारखे अंगावर फोड येतात, त्यांत ठणका फार असतो, त्याला विस्फोटक असें म्हणतात. हा विकार वातादि तीन दोषांनीं तीन प्रकारचा, त्या त्या दोन दोषांपासून तीन प्रकारचा, त्रिदोषन्य एक व रक्तजन्य एक असा आठ प्रकारचा आहे. हा विषाप्रमाणें प्राणघातक आहे.

---

## बालरोगनिदान.

ये गदा महतामुक्ताः स्युस्त एवार्भकेष्वपि।
किन्तु देहाग्निदोषादेर्लाघवाल्लघवः परम् ॥ २११ ॥

मोठ्या मनुष्यांना जे रोग होतात म्हणून सांगितलें आहे, ते सर्व रोग लहान मुलांनाहि होतात. परंतु देह, जठराग्नि व दोष ह्यांच्या अल्पत्वामुळें ते फार अल्प प्रमाणांत होतात.

### केवळ बालकांनाच होणारे विकार.

क्षीरालसः पृथग्दोषैर्लालास्रावोऽतिरोदनम्।
गुदपाकास्यपाकौ च दन्तोद्भेदादयः परे ॥ २१२ ॥

मुलांना दूषित दुधामुळें क्षीरालस नांवाचा रोग होतो. तो वा-

तादि तीन दोषांनीं तीन प्रकारचा आहे. ह्यामुळें लाळ गळते व मूल फार रडतें. त्याचप्रमाणें ( गुदप्रक्षालन वेळचेवेळीं न केल्यानें ) गुदपाक ( गुदद्वार पिकणें ) हा रोग होतो. ( उष्णतेमुळें ) मुलाचे तोंड येतें, त्याला आस्यपाक असें ह्मणतात. तसेंच दांत येते वेळींही मुलांना दुसरे कित्येक विकार होतात.

बालग्रहाचें लक्षण.

ऊर्ध्वं पश्येद्दतः खादेत्क्षिपेद्गात्रं वमेत्पयः।
जागर्ति रोदिति श्यावो ग्रहग्रस्तोऽर्भकः कृशः ॥ २१३ ॥

जेव्हां बालक डोळे वर चढवून पहातो, दांत खातो, आंग इकडे तिकडे टाकतो, दूध पाजिलें असतां ओकतो, त्याला झोप येत नाहीं, तो फार रडतो, व लहर आली असतां त्याचा चेहरा काळा निळा होतो, तेव्हां त्या मुलाला बालग्रहाची पीडा झाली आहे म्हणून समजावें. ह्या विकारामुळें मूल कृश होतें.

---

## स्त्रीरोगनिदान.

स्रावो गर्भस्याचतुर्थान्मासात्पातस्ततः परम्।

चार महिन्यांपर्यंत गर्भाचा स्राव होतो. त्यापुढें त्याला गर्भपात असें म्हणतात.

मूढगर्भलक्षण.

स मूढगर्भो यः स्थानाच्च्युतो न बहिरापतेत् ॥ २१४ ॥

जो गर्भस्थानापासून सुटला असून बाहेर येत नाहीं, त्याला मूढ गर्भ असें म्हणतात.

मृतगर्भलक्षण.

गर्भास्पन्दो धीविनाशो मृते गर्भेऽपचारतः।

कांहीं अपायांनीं जर गर्भ मृत झाला, तर पोटांत त्याचें चलन बंद होतें व त्यायोगें गर्भिणीला कांहीं सुचेनासें होतें.

मृतगर्भाचें असाध्य लक्षण.

विरेकशैत्यतृट्कम्पज्वराद्यैः सा न सिध्यति ॥ २१५ ॥

ढाळ होणें, थंडी वाजणें, तहान लागणें, अंगांत कापरें भरणें व ज्वर हीं मृतगर्भाचीं असाध्य लक्षणें आहेत.

## सूतिकारोगनिदान.

अङ्गमर्दो ज्वरः कम्पः पिपासा गुरुगात्रता ।
दाहशोथातिसारौ च सूतिकारोगलक्षणम् ॥ २१६ ॥

अंग मोडून येणें, ताप येणें, अंग कांपणें, तहान, अंग जड होणें, दाह, अंगाला सूज येणें व अतिसार हीं लक्षणें सूतिकारोग (बाळंतरोग) झाला असतां होतात.

## प्रदरनिदान.

असृक्स्रुतिः स्यात्प्रदरं योनिः स्त्रीणामनार्तवा ।

आर्तवकालावांचून इतर वेळीं जर स्त्रियांच्या गुह्येंद्रियांतून रक्तस्राव होत असेल, तर त्याला प्रदर म्हणावें.

### प्रदराचें लक्षण.

रुगंगमर्ददौर्बल्यक्षुत्तृट्पांडुत्वदाहकृत् ॥ २१७ ॥

स्राव होत असतांना पोटांत कळ येणें, अंग दुखणें, अशक्तपणा, भूक न लागणें, तहान लागणें, अंगावर फिक्कटपणा येणें व दाह होणें हीं लक्षणें प्रदररोग झाला असतां होतात.

### प्रदराचे प्रकार.

तच्चतुर्धा पृथक् सर्वैर्दोषैः स्यादार्तवं पुनः ।

हा प्रदर (रक्तप्रदर) वातजन्य, पित्तजन्य, कफजन्य व त्रिदोषजन्य असा चार प्रकारचा आहे.

### शुद्धार्तवाचें लक्षण.

शशास्रतुल्यं यच्चोक्तं धौतं वासो न रञ्जयेत् ॥ २१८ ॥

जें आर्तव (रज) सशाच्या रक्ताप्रमाणें लाल असतें आणि वस्त्र धुतलें असतां ज्याचा डाग राहात नाहीं, तें आर्तव शुद्ध आहे असें समजावें.

---

## ध्वजभंगनिदान.

अतिव्यवायशीलो यो न च वाजीक्रियारतः ।
ध्वजभंगमवाप्नोति स शुक्रक्षयहेतुकम् ॥ २१९ ॥

जो मनुष्य अतिशय मैथुन करीत असून वाजीकरण (शुक्रवर्धक) औषधें सेवन करीत नाहीं, त्याचें शुक्र क्षीण होतें, व शुक्र-

क्षीण झालें म्हणजे इंद्रियाचें चैतन्य नष्ट होतें. त्याला ध्वजभंग-( नपुंसकत्व ) रोग असें ह्मणतात.

नपुंसकत्वाचें लक्षण.

अल्पशीतोष्णतेजःक्षुत्पिपासाश्रमरुट्सहः ।
पिंडिकासंधिशिथिलो हीनबुद्धिबलेन्द्रियः ॥ २२० ॥

शीत किंवा उष्ण उपचार अल्प असले तर सहन करणारा, अल्प ऊन सहन करणारा, त्याचप्रमाणें भूक, तहान, श्रम व पीडा हींही अल्प असलीं तर सहन करणारा, असा असून ज्याच्या लिंगाचे संधि शिथिल झाले आहेत असा जो मनुष्य, तो नपुंसक समजावा. म्हणजे नपुंसकाचीं हीं लक्षणें आहेत. ह्याशिवाय नपुंसक मनुष्य बुद्धिहीन व इंद्रियसामर्थ्यहीन असतो.

धातुक्षीणतेचें लक्षण.

पाण्डुरोऽल्परतिस्तोयतुल्यरेताश्श्लथध्वजः ।
मन्दवह्निश्च दीनश्च क्षीणशुक्रो नरो मतः ॥ २२१ ॥

ज्याची अंगकांति फिक्कट आहे, ज्याला फार वेळ स्त्रीशीं रत होतां येत नाहीं, ज्याचें शुक्र पाण्याप्रमाणें पातळ आहे, ज्याचें इंद्रिय शिथिल ( चैतन्यरहित ) झालें आहे, ज्याचा अग्नि मंद झाला आहे, व जो काळजींत दिसतो, असा मनुष्य धातुक्षीण समजावा.

नपुंसकत्वाचें असाध्य लक्षण.

असाध्यं सहजं क्लैब्यं मर्मच्छेदाच्च यद्भवेत् ।
साध्यानामितरेषां च कार्यो वाजीक्रियाक्रमः ॥ २२२ ॥

जें नपुंसकत्व जन्मतः असतें तें आणि मर्मस्थानाचा छेद झाल्यामुळें जें येतें तें, हीं दोन्ही असाध्य समजावीं. आणि ह्याव्यतिरिक्त अन्य कारणांनीं उत्पन्न झालेलीं जीं नपुंसकत्वें त्यांच्यावर वाजीकरण ( शुक्रवृद्धिकर ) प्रयोग योजावे.

नेत्ररोगनिदान.

धूलिधूमार्कशाकाम्लतीक्ष्णस्त्रीजागरादिभिः ।
गंडूषांजननस्यादिहीनानां स्युर्दृगामयाः ॥ २२३ ॥

धूळ डोळ्यांत जाणें, डोळ्याला धूर लागणें, सूर्याकडे बरचेवर पहाणें, भाज्या, आंबट व तीक्ष्ण पदार्थ फार खाणें, मैथुन व जा-

गरण करणें या कारणांनीं व गुळण्या करणें, डोळ्यांत अंजन घालणें, व नस्य ( नाकांत औषध घालणें ) हे उपचार न करणाऱ्या मनुष्याला नेत्ररोग होतात.

## कांहीं नेत्ररोगांचीं नांवें.

तिमिरं पटलं काचमभिष्यन्दोऽधिमन्थकः ।
पक्ष्मकोपो व्रणकोपश्चेत्याद्या नयनामयाः ॥ २२४ ॥

तिमिर ( अंधत्व ), पडल ( पडदा ), काच ( मोतीबिंदु ), अभिष्यंद ( डोळे येणें ), अधिमंथ, पक्ष्मकोप, व व्रणकोप इत्यादि ( शहाण्णव ) नेत्ररोग आहेत.

## नेत्रकोपाचे प्रकार.

नेत्रकोपः पृथक्सर्वैस्तैरस्राच्चान्यहेतुनः ।

नेत्रकोप ( डोळे येणें ) हा विकार वातादि तीन दोषांनीं तीन प्रकारचा, त्रिदोषजन्य एक, रक्तजन्य एक व अन्य कारणांनीं होणारा म्हणजे आगंतुक एक असा पांच प्रकारचा आहे.

## त्यांचें लक्षण.

रुगश्रुरागशोथाद्यैरामः पक्वस्ततोऽन्यथा ॥ २२५ ॥

ठणका, पाणी येणें, लाली व सूज हे विकार असले म्हणजे तो नेत्रकोप ( डोळे येण्याचा विकार ) आम ( अपक्व; पूर्ण अवस्थेस न आलेला ) असा समजावा. आणि ह्याच्या उलट लक्षणें असलीं म्हणजे तो विकार पक्व समजावा.

## तिमिर, पटल व काचबिंदु ह्यांचें लक्षण.

अव्यक्तं तिमिरी चैकमनेकं पटलीक्षते ।
काची सूक्ष्माम्बरच्छन्नदृगिवोर्ध्वमधो न तु ॥ २२६ ॥

तिमिर रोग ज्याला आहे त्याला कांहीं दिसत नाहीं. ज्याला पटल ( पडदा ) आलें आहे, त्याला एक वस्तु अनेकत्वानें दिसते; ज्याला काचबिंदु आहे त्याला सूक्ष्म वस्त्रांतून पाहिल्याप्रमाणें पुसट असें व वरील बाजूकडे दिसतें, खालीं दिसत नाहीं.

## शिरोरोगनिदान.

अकालपलितं पीडा सूर्यावर्तार्द्धभेदकाः ।
इन्द्रलुप्तं केशपात इत्याद्याः स्युः शिरोगदाः ॥ २२७ ॥

अकालपलित ( अकालीं केस पांढरे होणें ), डोकें दुखणें, सूर्या-वर्त (सूर्य चढेल तसें डोकें अधिक दुखणें व उतरेल तसें कमी होणें ), अर्धावभेदक ( अर्धे डोकें दुखणें ), इंद्रलुप्त ( चाई ); केशपात ( केस गळणें ) वगैरे शिरोरोग आहेत.

## कर्णरोगनिदान.

करोति विगुणो वायुर्मलं संगृह्य कर्णयोः ।
सकफः पाकबाधिर्यशूलस्रावादिकान्गदान् ॥ २२८ ॥

दूषित झालेला वायु कानांतील मळाला शुष्क करून कफाचा आश्रय करून कर्णपाक ( कानांत पुटकळ्या उठणें ), बहिरेपणा , शूळ व कानांतून पू वहाणें इ. कर्णरोग उत्पन्न करितो.

## नासारोगनिदान.

अर्शोऽस्रस्रावपिडिकापूयस्रावश्च पीनसः ।
प्रतिश्यायश्छिक्का चेत्याद्या नासामयाः स्मृताः॥२२९॥

अर्श ( नाकांत मोड येणें ), नाकातून रक्त येणें, नाकांत फोड येणें, नाकांतून पू येणें, पीनस ( ज्या रोगांत नाकास वास कळत नाहीं तो ), पडसें व शिंका येणें इत्यादि नासारोग आहेत.

## मुखरोगनिदान.

सरक्तः कुरुते श्लेष्मा दन्तार्शो दन्तचालनम् ।
दौर्गंध्यपिडिकापाकमूकादींश्च गदान्मुखे ॥ २३० ॥

कफदोष रक्तासह दातांच्या मुळांचा आश्रय करून दंतार्श ( दांतावर मांस वाढणें ) व दांत हालणें हे रोग उत्पन्न करितो. तोंडाला घाण येणें, तोंडांत फोड येणें, तोंड येणें ( मुखपाक ) व मूकत्व वगैरे मुखरोग आहेत.

## विषनिदान.

जिह्वामौढ्यशिरोदाहभ्रमोन्मादारुचिज्वरैः ।
श्वासहिक्कादन्तहर्षैर्जानीयात्स्थावरं विषम् ॥ २३१ ॥

जिभेला चव न कळणें, मस्तक तापणें, घेरी येणें, उन्माद, अरुचि, ज्वर, श्वास, उचकी व दांत शिवशिवल्यासारखें वाटणें हीं लक्षणें स्थावर विष पोटांत गेलें असतां होतात.

### सर्पदंशलक्षण.

दंशवैवर्ण्यशोथाभ्यां सेकोरक्तसंभ्रमः ।
निद्राक्षिरागरसनामौढ्यैश्चाहिविषं वदेत् ॥ २३२॥

ज्या ठिकाणीं दंश झाला असेल त्या ठिकाणच्या त्वचेचा वर्ण बदलणें, त्या ठिकाणीं सूज येणें, मळमळणें, रेच होणें, डोळ्यापुढें अंधारी येणें, घेरी येणें, डोळे लाल होणें आणि जिभेला चव न कळणें, हीं लक्षणें झालीं असतां सर्पदंश झाला आहे असें समजावें.

### वृश्चिकदंशलक्षण.

विद्धं तु वृश्चिकेनांगं ज्वलदंगारभागिव ।
सदाहरुङ्मोहमन्यद्यथास्वं विषमुन्नयेत् ॥ २३३॥

विंचू चावला असतां ( विंचवानें नांगा मारला असतां ) तेथें पेटलेला निखारा लागावा अशी पीडा होते, दाह होतो, कळा होतात व मूर्च्छा येते. दुसऱ्या कोणत्याही विषारी प्राण्याचा दंश झाला असतां त्या त्या प्राण्यांच्या ( शरीरादिकांच्या ) अनुमानानें त्यांच्या दंशादिकांचीं लक्षणें जाणावीं.

### उपसंहार.

अतिविस्तरपुस्तकपाठभयादतिह्रस्वतया धृतभूरिधियाम् ।
नयनानलदङ्मितपद्यकृतं भिषजामिदमञ्जनमस्तु मुदे ॥ २३४॥

अतिशय विस्ताराचा ग्रंथ पाठ करण्याला फार प्रयास पडतात, ह्या भीतीनें बुद्धिवानाला अत्यंत संक्षेपतः पाठ करतां यावा अशा सोईचा हा दोनशें बत्तीस श्लोकांचा अंजननिदान नांवाचा ग्रंथ मीं केला आहे. तो वैद्याना आनंददायक होवो.

चकार चतुरोऽञ्जनं तदिदमग्निवेशोऽञ्जनं ।
परोपकृतये कृतं परिमितं रुजां ज्ञापकम् ॥
ततः समुदितैस्सदा सुकृतराशिभिस्तुष्यतां ।
तुषारगिरिकन्यकापरिवृढः सयोषित्सुतः ॥ २३५॥

चतुर अशा अग्निवेशानें ( संक्षिप्त ) असा हा रोगज्ञान करून देणारा अंजननिदान नांवाचा नेत्रांजनरूप ग्रंथ परोपकारार्थ केला. ह्या ग्रंथाच्या योगानें श्रीकार्तिकस्वामी, श्रीगणपति व जगन्माता पार्वती ह्यांच्यासहवर्तमान भगवान श्रीशंकर सर्वकाळ प्रसन्न असो.

इति श्रीमहर्षिअग्निवेशविरचितमंजननिदानं समाप्तम् ॥

---

